# संस्कृतभाषाप्रदीप

## पुस्तक–२ रें

(दुय्यम शाळांतील पांचव्या इयत्तेकरितां)

सखाराम रावजी भट, एम्.ए., बी.टी.

'मॅट्रिक्युलेशन संस्कृत ग्रॅमर', 'संस्कृत-वाक्यरचना' व 'संस्कृत-भाषाप्रदीप-पु. १ लें' या पुस्तकाचे कर्ते

मॅक्मिलन् ॲण्ड कंपनी, लिमिटेड,

हॉर्न्बी रोड, कोट, मुंबई

किंमत १४ आणे ]        १९३७        [ सर्व हक्क स्वाधीन

# प्रस्तावना



दुय्यम शाळातील चौथ्या इयत्तेकरिता 'संस्कृतभाषाप्रदीप-पुस्तक १ लें' गेल्या मे महिन्यामध्यें प्रसिद्ध केल्यानंतर, पाचव्या इयत्तेकरिता दुसरें पुस्तक वेळेवर प्रसिद्ध करणें क्रमप्राप्त होतें. त्याप्रमाणें हें दुसरें पुस्तक योग्य वेळीं प्रसिद्ध करण्यात येत आहे. या पुस्तकाची रचना पहिल्या पुस्तकाच्या धर्तीवरच तीन भागात केलेली आहे, व विषयाची मांडणीहि आधुनिक अध्यापनशास्त्राच्या तत्त्वानुसार केलेली आहे.

**१ व्याकरणविभागः**—प्रवेशपरीक्षेच्या नव्या संस्कृत अभ्यासक्रमाप्रमाणें दुय्यम शाळातील चौथी ते सहावी इयत्तापर्यंत संस्कृत व्याकरणाचें ज्ञान सामान्यपणें देणें आवश्यक आहे. म्हणून पाचव्या इयत्तेच्या या पुस्तकामध्यें सर्वनामें व द्वितीयगणसमूहाचे धातु याशिवाय स्वरान्त व व्यंजनान्त नामें, संख्याविशेषणें, तरतमवाचक रूपें व मुख्य मुख्य समास यासंबंधी पाठ दिलेले आहेत. त्यामुळें पाचवीचा संस्कृत व्याकरणविषय, शिकणारास व शिकविणारास, नेहमींप्रमाणें दुर्घट वाटणार नाहीं. या विभागात एकंदर व्याकरणपाठ १५ आहेत, परंतु पहिल्या पुस्तकातील शेवटचे व्यंजनान्त नामाचे ४ पाठ चौथ्या इयत्तेंत पुरे न झाल्यास ते पाचव्या इयत्तेंत प्रथम घेऊन नंतर हे १५ घेता येतील, व हे सर्व पाठ साधारणपणें एक वर्षांत पुरे करता येतील. पाचव्या इयत्तेचा व्याकरणविषय बराच अपवादात्मक असल्यामुळें क्रियापदें व नामें वगैरेंचीं सर्व रूपें प्रथम देऊन नंतर त्यांची फोड करून दाखविलेली आहे, व रूपसिद्धीसाठीं आवश्यक असणाऱ्या नियमाचा उल्लेख कंसात करून ते नियम पुस्तकाच्या आरंभीं 'प्रास्ताविक माहिती' म्हणून दिलेले आहेत. वाङ्मयातील उदाहरणावरून व्याकरण शिकविण्याची पहिल्या पुस्तकातील पद्धति या पुस्तकातहि अवलंबिलेली आहे. त्याचप्रमाणें सामान्य व हुषार अशा दोन्ही तऱ्हेच्या विद्यार्थ्यांची सोय व्हावी म्हणून व्याकरणविभागाला दोन परिशिष्टें जोडलेलीं आहेत. एकात १ ते १० गणाचे अनियमित धातु दिलेले आहेत व दुसऱ्यात जे धातु एकाहून अधिक गणाचे आहेत त्यातील मुख्य मुख्य दिलेले आहेत. शिवाय प्रत्येक पाठावर आधुनिक

बद्दल अनुकूल अभिप्राय देऊन प्रस्तुत दुसरें पुस्तक लिहिण्यास प्रोत्साहन दिलें त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्याचप्रमाणें श्री. ग. र. दारशेतकर बी.ए., बी.टी., व श्री. मो. ना. भालेराव एम्.ए., बी.टी यांनीं आपुलकीनें जी मदत केली व उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचे आभार मानून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतो.

फेब्रुवारी १९३७

स. रा. भट

---

# संस्कृतभाषाप्रदीप—पुस्तक २ रें.

## अनुक्रमणिका

### भाग १—व्याकरण-पाठ

# प्रास्ताविक माहिती

---

## रूपसिद्धीला उपयुक्त सन्धिनियम

१ एखाद्या रूपाच्या शेवटीं एकाहून अधिक व्यंजनें आल्यास, पहिलें कायम ठेवतात व इतरांचा लोप करतात. जसें—मरुत्+स्-मरुत् (प्रथमा ए. व.) अपवाद-र्क्, र्ट्, र्त्, र्प्.

२ रूपाच्या शेवटील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें प्रथम किंवा तृतीय व्यंजन येतें. जसें—मरुत्-द्, वाच्-ग्.

३ प्रत्ययाच्या आद्य स्वर, अर्धस्वर किंवा अनुनासिकें यापूर्वी शब्दाचें अन्त्य मूळ व्यंजन कायम राहातें, जसें—शशिन्+अस्-शशिन, रुन्ध्+व-म-रुन्ध्व-रुन्ध्म.

४ प्रत्ययाच्या आद्य कठोर व्यंजनापूर्वी मागील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें प्रथम व्यंजन येतें. जसें—समिध्+सु-समित्सु.

५ प्रत्ययाच्या आद्य मृदु व्यंजनापूर्वी मागील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन येतें. समिध्+भ्याम्-समिद्भ्याम्.

६ प्रत्ययाच्या आरंभी अर्धस्वर व अनुनासिकें याशिवाय इतर व्यंजनें असल्यास अथवा कोणताहि प्रत्यय पुढें नसल्यास (पहिल्या नियमानुसार लोप झाल्याकारणानें), धातूच्या अथवा नामाच्या अंगाच्या अन्त्य व्यंजनाचा पुढें लिहिल्याप्रमाणें फरक होतो.

अन्त्य क्, ख्, ग्, घ्, च्, ज्, श्ज् याचा क् होतो.
,, ट्, ठ्, ड्, ढ्, ,, ट् ,,
,, त्, थ्, द्, ध्, ,, त् ,,
,, प्, फ्, ब्, भ्, ,, प् ,,
,, श्, ष्, ह्, ,, ष् ,,

परंतु (अ) सृज्, मृज्, यज्, राज्, भ्राज् याच्या अन्त्य 'ज्'चा 'ष्' होतो.

(आ) दिश्, दृश्, स्पृश्, याच्या पुढें नामाना लागणारा प्रत्यय आल्यास अथवा काहीं न आल्यास 'श्'ना 'क्' होतो, आणि इतर वेळेला 'ष्' होतो.

(इ) वरील ठिकाणीं नश्च्या 'श्'चा 'ष्' किंवा 'क्' होतो.

जसें—(अ) मृज्+त-मृष्+त. । (आ) दिश्+सु-दिक्+सु । दिश्+त-दिष्+त । (इ) नश्+स्यति-नष्+स्यति । नश्+त-नष्+त.

७ अन्त्य क्, ट, त्, प् यांच्या पुढें अर्धस्वर व अनुनासिकें याशिवाय अन्य मृदु व्यंजनानी आरंभ झालेला प्रत्यय आल्यास त्याचा अनुक्रमें ग्, ड्, द्, ब् होतो. जसें—दिश्+भ्याम्-दिक्+भ्याम् (आ)-दिग्+भ्याम् ।

८ एकाच शब्दाच्या रूपामध्यें ऋ, र् व ष् याच्यापुढें 'न्' हें व्यंजन आल्यास 'न्'चा 'ण्' होतो. हा फरक 'ऋ, र्, ष् आणि न्' याच्यामध्यें स्वर, अर्धस्वर (ल् शिवाय), ह्, कवर्ग व पवर्ग याचें व्यंजन आलें असतानाहि होतो. मात्र 'न्' रूपाच्या शेवटीं असूं नये. जसें—हरि+ना-हरिणा, परंतु हरीन्.

९ प्रत्ययाच्या आद्य 'स्'चा 'ष्' होतो, मात्र त्या 'स्' पूर्वी अ-आ शिवाय स्वर, कवर्गाचें व्यंजन, र् किंवा ह् यापैकीं वर्ण असला पाहिजे. हे वर्ण व स् यामध्यें अनुस्वार किंवा विसर्ग आल्यास चालेल. जसें—वाच्+सु-वाक्+सु (६)-वाक्+षु.

१० (अ) अन्त्य ष् पुढें स् हा आद्य वर्ण असलेला धातुप्रत्यय आला तर ष्चा क् होतो, मात्र त्या स्चा नि. १ प्रमाणें लोप होता कामा नये. जसें—मृज्+सि-मार्ज्+सि-मार्ष्+सि (६ अ)-मार्क्+सि.

(आ) अन्त्य ष् हा त्-थ् हे आद्य वर्ण असलेल्या प्रत्ययापूर्वी तसाच राहतो. जसें—मृज्+तः-मृष्+तः (६ अ).

(इ) अन्त्य 'ष्'चा इतर सर्व ठिकाणीं ट् किंवा ड् होतो. जसें—अ+मार्ज्+स्-अमार्ष्+स्-अमार्ष् (१)-अमार्ट्-ड्.

११ तवर्ग किंवा स् आणि टवर्ग किंवा ष् याचा सन्धि करताना तवर्गाच्या व्यंजनाबद्दल अनुक्रमें टवर्गाची व्यंजनें येतात व स् बद्दल ष् येतो. जसें— मृज्+तः–मृष्+त (६ अ)–मृष्+ट ।

१२ अन्त्य ह् चा, लोप न होणाऱ्या व स् हा आद्य वर्ण असणाऱ्या प्रत्ययापूर्वी, क् होतो; व इतर ठिकाणीं अथवा नामप्रत्ययापूर्वी घ् होतो, मात्र शब्दाचा आद्य वर्ण द् पाहिजे व इतर आद्य वर्ण असेल तर ढ् होतो. जसें—दुह्+सि–दोक्+सि । दुह्+ति–दोघ्+ति । लिह्+सि–लेक्+सि । लिह्+ति–लेढ्+ति ।

१३ अन्त्य घ्, ध्, भ् पुढें त् किंवा थ् हे आद्य वर्ण असलेले प्रत्यय आले तर त्याचा ग्, द् व ब् होतो, आणि त् किंवा थ् याचा ध् होतो. जसें— दोघ्+ति–दोग्+धि । रुणध्+ति–रुणद्+धि ।

१४ अन्त्य ढ् पुढें त्–थ्–ध् यापैकीं वर्ण प्रत्ययाच्या आरंभी आल्यास ढ् चा लोप होतो व ऋ शिवाय मागील इतर स्वर दीर्घ होतो, आणि त्–थ्–ध् चा ढ् होतो. जसें—लेढ्+ति–लेढ्+ढि–लेढि.

१५ शब्दाच्या आरंभीं ब्, ग्, द् व अन्त्य वर्ण घ्, ढ्, ध्, भ् किंवा ह् असेल आणि जेव्हा पुढें कोणताहि वर्ण नसेल किंवा स्–ध्व् हे प्रत्ययाचे आद्य वर्ण असतील, तर आद्य ब्, ग्, द् याचे फरक अनुक्रमें भ्, घ्, ध् असे होतात. अ+दोह्+स्–अदोघ्+स्–अधोक्–ग्(२)

१६ प्र. भूतकाळाच्या स् व त् या प्रत्ययाचा नि. १ प्रमाणें लोप केला असता अंगाच्या अन्त्य त्, थ्, द्, ध् व स् बद्दल द्वि. पु. एकवचनात त्–द् किंवा स् येतो व तृ. पु. एकवचनात त् किंवा द् येतो. अवेद्+स्–अवे – त्–द् । अवेद्+त्–अवेत्–द् ।

१७ धातूच्या अन्त्य ‘स्’ चा, द्वि. पुरुषी ‘ध’ नें आरंभ होणाऱ्या प्रत्ययां-पूर्वी लोप होतो. आस्+ध्वे–आध्वे ।

१८ ए, ऐ, ओ व औ यापुढें स्वर आला तर त्याचे अनुक्रमें अय्, आय्, अव व आव् असे फरक होतात. अजुहो+अम्–अजुहव्+अम् ।

# पाठ १

## सर्वनामें व सार्वनामिक विशेषणें.



(अ) १ यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम् ।
२ इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
३ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
४ यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः ।
५ असौ प्रसन्ना वाग्देवी कवयो महयन्ति याम् ।
६ हेतोरमुष्य जीवस्य न कुर्यात्पातकं नरः ।
७ अमुना भक्तिमार्गेण नरो भवति मोक्षभाक् ।
८ अमूनि धर्मकार्याणि नरः कुर्यादतन्द्रितः ।

वरील वाक्यात यद् व अदस् या सर्वनामाची रूपें योजलेली आहेत. यद् (जो-जी-जें) ह्याचा उपयोग मिश्र वाक्यात होतो व याचे साहाय्यानें गौण वाक्य मुख्य वाक्याशीं जोडलें जातें, आणि त्याचा पूर्वगामी शब्द (नाम किंवा सर्वनाम) हा मुख्य वाक्यात योजला जातो. यद् याचें रूप गौण वाक्याला आवश्यक असणाऱ्या विभक्तींनें योजलें जातें व पूर्वगामी शब्दाचें रूप मुख्य वाक्याला आवश्यक असणाऱ्या विभक्तींत योजलें जातें. मात्र लिंग व वचन यामध्यें यद् व पूर्वगामी शब्द यामध्यें ऐक्य असलेंच पाहिजे. विभक्तींत (१ त्या वाक्याप्रमाणें) असेल किंवा (इतर वाक्याप्रमाणें) नसेल

अदस् (तो-ती-तें, हा-ही-हें) या दर्शक सर्वनामाची रूपें तीन्ही लिंगामध्यें केलीं जातात व तीं रूपें ज्या नामाशीं त्याचा संबंध असेल त्याच्याशीं लिंग, विभक्ति व वचन यांमध्यें जुळणारीं असतात.

टीप — 'एतद्' हें अगदीं अवळच्या वस्तूबद्दल, 'इदम्' हें त्याहून थोड्या दूर असणाऱ्या वस्तूबद्दल, 'अदस्' हें बऱ्याच दूरच्या दृश्य वस्तूबद्दल आणि 'तद्' हें दृष्टीआड असणाऱ्या वस्तूबद्दल योजतात.

| | |
|---|---|
| १ यस्य-( पु ए. व षष्ठी ) | तस्य-( पु ए व षष्ठी ) |
| २ येषाम्-( पु ब व षष्ठी ) | तै -( पु ब व तृतीया ) |
| ३ ये-( पु ब व प्रथमा ) | तान्-( पु ब व द्वितीया ) |
| ५ याम्-( स्त्री ए व द्वितीया ) | असौ-( स्त्री ए व प्रथमा ) |

**असौ** हें रूप वाग्देवी याप्रमाणें, **अमुष्य** हें जीवस्य याप्रमाणें, **अमुना** हें भक्तिमार्गेण याप्रमाणें आणि **अमूनि** हें धर्मकार्याणि याप्रमाणें लिंग, विभक्ति व वचन सामर्थ्यें आहे

**यद्** याचीं रूपें **तद्** च्या रूपाप्रमाणें करावीं, मात्र प्र. ए. व (पु)-**यः** व (स्त्री) **या** असें करावें.

यद्

| पु | | | | स्त्री. | | | न. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| यः | यौ | ये | **प्र.** | या | ये | याः | यद् | ये | यानि |
| यम् | ,, | यान् | **द्वि.** | याम् | ये | याः | ,, | ,, | ,, |
| येन | याभ्याम् | यैः | **तृ.** | यया | याभ्याम् | याभिः | तृ० ते स० पर्यंत | | |
| यस्मै | ,, | येभ्यः | **च.** | यस्यै | ,, | याभ्यः | पुल्लिंगाप्रमाणें. | | |
| यस्मात् | ,, | ,, | **पं.** | यस्याः | ,, | ,, | | | |
| यस्य | ययोः | येषाम् | **ष.** | ,, | ययोः | यासाम् | | | |
| यस्मिन् | ,, | येषु | **स.** | यस्याम् | ,, | यासु | | | |

अदस्

| पु | | | | स्त्री | | |
|---|---|---|---|---|---|---|
| असौ | अमू | अमी | **प्र.** | असौ | अमू | अमूः |
| अमुम् | ,, | अमून् | **द्वि.** | अमूम् | ,, | ,, |
| अमुना | अमूभ्याम् | अमीभिः | **तृ.** | अमुया | अमूभ्याम् | अमूभिः |
| अमुष्मै | ,, | अमीभ्यः | **च.** | अमुष्यै | ,, | अमूभ्यः |
| अमुष्मात् | ,, | ,, | **पं.** | अमुष्याः | ,, | ,, |
| अमुष्य | अमुयोः | अमीषाम् | **ष** | अमुष्याः | अमुयोः | अमूषाम् |
| अमुष्मिन् | ,, | अमीषु | **स** | अमुष्याम् | ,, | अमूषु |

**न.**—प्र. द्वि.—अद अमू अमूनि. इतर पुल्लिंगाप्रमाणें.

टीपः—विशेष माहिती स. वाक्यरचना पाठ २९ मध्यें पहा.

(आ) १ यावच्चित्तस्य शुद्धत्वं लभ्यते ज्ञानिभिः खलु ।
तावती मनसः शुद्धिर्नेतरेषां कदाचन ॥

२ एतावद्भिः प्रयत्नैश्च लभते ना परं यशः ।

३ इयतापि प्रयत्नेन मोक्षप्राप्तिः सुदुर्लभा ।

४ सागरे कति रत्नानि कति जीवाश्च शुक्तयः ।
अब्धेः सम्पदपारास्ति सा हि ज्ञातुं न शक्यते ॥

५ कियन्तस्ते सन्तो जगति विदिताः स्वार्थविमुखाः ।

वरील वाक्यात यावत्, तावत्, एतावत्, इयत् व कियत् हीं यद्, तद्, एतद्, इदम् व किम् या सर्वनामाना 'वत्' किंवा 'यत्' हा प्रत्यय लावून होणारी परिमाणदर्शक विशेषणें योजलेलीं आहेत. त्याचप्रमाणें 'कति' हें सख्यावाचक प्रश्नार्थक विशेषण योजलेलें आहे.

'वत्' व 'यत्' प्रत्यय लावून झालेल्या विशेषणाचीं रूपें 'गुणवत्' प्रमाणें तीन्ही लिंगामध्यें होतात.

जसें—पु.—यावान् यावन्तौ यावन्तः इ.
स्त्री—यावती यावत्यौ यावत्यः इ.
न.—यावत् यावती यावन्ति इ.
} 'गुणवत्' प्रमाणें

'कति' याचीं रूपें तीन्ही लिंगांचीं सारखींच होतात, व त्याचा उपयोग बहुवचनांतच होतो.

प्र. द्वि. सं.—कति, तृ.—कतिभिः, च. पं.—कतिभ्यः, ष.—कतीनाम्, स.—कतिषु.

(इ) १ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः । (कृष्णस्य)

२ नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ।

३ एतया कल्याणमन्येषां हितं स्वस्य करोति ना ।

४ स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।

५ मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यद्दुरात्मनाम् ।

६ एके यतन्ते द्युम्नाय परे ज्ञानार्थमेव च ।
एकेषां दृश्यते स्वार्थोऽपरेषां सूत्तमा गतिः ॥

७ यज्जन्मनि कृतं पूर्वं तद्दैवमिति कथ्यते ।

वरील वाक्यात एक, पर, पूर्व, अपर, अन्य व स्व यांची रूपें योजलेली आहेत. ही सार्वनामिक विशेषणें होत, कारण यांची रूपें सर्वनामाप्रमाणें होतात. यांतील अन्य व इतर हीं पूर्णपणें 'यद्' प्रमाणें चालतात. **पूर्व, पर, अपर, उत्तर, दक्षिण व स्व** हे 'स्थल, काल, दिशा व मनुष्य' यांचा संबंध दर्शविणारे शब्द सर्वनामाप्रमाणें चालतात; मात्र पुलिंगी प्र. ब. व., पं. ए. व., व स. ए. व. यामध्यें 'देव' प्रमाणेंहि चालतात. 'एक' हा बहुवचनात (कांहीं-कित्येक या अर्थी) सर्वनामांप्रमाणें चालवितात.

पूर्व—प्र. ब. व. पूर्वे-पूर्वाः, पं. ए. व. पूर्वात्-पूर्वस्मात्, स. ए. व. पूर्वे-पूर्वस्मिन्
पर— ,, परे-परा, ,, परात्-परस्मात्, ,, परे-परस्मिन्
स्व— ,, स्वे-स्वाः, ,, स्वात्-स्वस्मात्, ,, स्वे-स्वस्मिन्

टीपः—'विश्व-सर्व' हा शब्दहि सर्वनामाप्रमाणें चालतो. जसें-विश्वे देवाः । 'विश्वम्-जग' हा शब्दहि सर्वनामाप्रमाणें चालतो.

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| अतन्द्रित (वि.)-निरालसी, उत्साहयुक्त | प्र+पद् (४ आ. प.)-शरण जाणें | संसिद्धिः (स्त्री.)-यश |
| अब्धिः (पु.)-समुद्र | भिषज् (पु.)-वैद्य | सर्गः-(जन्ममरणरूपी) स्वाभाविक स्थिति |
| दुरात्मन् (पुं.)-दुष्ट मनुष्य | रिक्थम्-वडिलोपार्जित धन | सम्+मन् (प्रयोजक)-सत्कार करणें |
| द्युम्नम्-धन | विभवः-ऐश्वर्य, सम्पत्ति | हालाहलम्-समुद्रमंथनाचे वेळी निघालेलें विष |
| निरामय (वि.)-निरोगी | विवस्वत् (पु.)-सूर्य | |
| प्रज्ञा (स्त्री.)-शहाणपण, बुद्धि | वीणा (स्त्री.)-एक वाद्य | |
| | शुक्तिः (स्त्री.)-शिंपला | |

## प्रश्न

१ पुढील वाक्यात रिकाम्या जागी सार्वनामिक रूपें योजा —

१ ——— साहाय्येन रामेण जय लब्ध तान् कपीन् स सममानयत्।

२ ——— उद्योग नर करोति तावान् लाभ भवति तस्य ।

३ यस्या हस्त वीणया अलङ्क्रियते ——— सरस्वत्यै नम ।

४ ——— एव मे विभव भवन्तु सेवितुम्।

५ ——— कालेन मित्र निरामय भवेत् इति राम भिषजम् अपृच्छत्।

२ सम्बन्धी सर्वनामयुक्त गौण वाक्यें योजा —

१ ——— तेन शिवेन हालाहल पीतम्।

२ ——— स सुग्रीव किष्किन्धाराज्ये स्थापित ।

३ ——— तया दमयन्त्या सङ्कटानि अनुभूतानि ।

४ ——— तानि एव सन्मित्राणि ।

५ ——— तावता एव धनेन नर धर्मकार्य कुर्यात्।

३ पुढील वाक्यांत कसांत दिलेल्या शब्दांची योग्य रूपें योजा —

१ (अदस्) क्षुद्राणा प्राणाना कृते नर असत्य न वदेत्।

२ सायङ्काले (एक) समुद्रतीरं गच्छन्ति (अन्य) उद्यान (अपर) च गृहे एव तिष्ठन्ति ।

३ नर (अन्य) धन न लुभ्येत्। (स्व) एव धनेन सन्तुष्येत्।

४ (पूर्व) जन्मनि कृत कर्म (इदम्) जन्मनि फलम् आवहति ।

५ (पर) ब्रह्मणि 'नेति नेति' इति वर्णनम् उपयुज्यते ।

६ (कति) (मार्ग) मोक्ष लभ्यते। (अदस्) (मार्ग) क सुलभ ।

७ रिक्थस्य (कियत्) अश ज्येष्ठस्य पुत्रस्य (अन्य) च इति स्मृतिषु निर्दिश्यते ।

८ (एतावत्) शक्ति आत्मन रक्षणाय न अलम्।

९ (कति) शनिपानानि धाविष्णो । (कति) प्रकारै तस्य पूजा क्रियते।

१० (यद्) पाण्डवा जिता ते कौरवा राज्यसुखम् अन्वभवन्।

## आज्ञार्थ

| आप् (५ प. प.) | | | अश् (५ आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| आप्नवानि | आप्नवाव | आप्नवाम | अश्नवै | अश्नवावहै | अश्नवामहै |
| आप्नुहि | आप्नुताम् | आप्नुत | अश्नुष्व | अश्नुवाथाम् | अश्नुध्वम् |
| आप्नोतु | आप्नुताम् | आप्नुवन्तु | अश्नुताम् | अश्नुवाताम् | अश्नुवताम् |

## विध्यर्थ

चि (५ प. प.)

चिनुयाम् चिनुयाव चिनुयाम इ.

चि (५ आ. प.)

चिन्वीय चिन्वीवहि चिन्वीमहि इ.

आप् (५ प. प.) आप्नुयाम् आप्नुयाव इ. अश् (५ आ. प.) अश्नुवीय अश्नुवीवहि इ.

टीपः—स्वरान्त परस्मैपदी धातूंना आज्ञार्थी द्वि. पु. ए. वचनामध्यें प्रत्यय लागत नाहीं.

पंचम गणाचे स्वरान्त धातु 'चि' प्रमाणें चालवावे आणि व्यंजनान्त धातु परस्मैपदामध्यें 'आप्' प्रमाणे चालवावे. आत्मनेपदी व्यंजनान्त धातु फक्त 'अश्' हाच आहे. जरूर तेथें विकरणातील 'न्' चा 'ण्' करावा.

## पंचमगणाचे धातु

अश् (आ. प.)–व्यापणें, मिळविणें, उपभोगणें
  वि ,, –व्यापणें
आप् (प. प.)–मिळणें, मिळविणें
  [illegible] ,, –पोंचणें, मिळणें
  वि ,, –व्यापणें
  सम् ,, –संपाविणें
चि (उ. प.)–जमविणें
  अप ,, –कमी होणें
  अव, उद्, प्र, सम्, समुद्–जमविणें, एकत्र करणें
  उप (उ. प.)–वाढविणें
  निस् ,, –निश्चय करणें

वि (उ. प.)–जमविणें, शोधणें
दु (प. प.)–पीडा देणें, दुःख देणें
धु-धू (उ. प.)–हालवणें
  अव, वि ,, –अपमान करणें
धृष् (प. प.)–धीर करणें, आव्हान देणें
राध् (प. प.)–सिद्धीस नेणें, प्रार्थना करणें, मारणें
  आ अनु (प. प.)–प्रार्थना करणें, संतुष्ट करणें
  अप ,, –इजा करणें, मारणें
वृ (उ. प.)–निवडणें, आच्छादणें, वेढणें

# पाठ २

## द्वितीयगणसमूह—पंचम गण.

---

१ पुष्पात्पुष्पं भ्रमन्भृङ्गश्चिनोति लवशो मधु ।

२ सन्मार्गेण हि गन्तारः प्राप्नुवन्ति शिवां गतिम् ।

३ सन्तर्पणाय देवानां सोमं च सुनुमो वयम् ।

४ शृणोषि न हितं सम्यक् सन्मार्गं न गच्छसि ।

५ अन्वेषणाय सीतायाः सुग्रीवः प्राहिणोत् कपीन् ।

६ सञ्चिनोतु नरः पुण्यं सदाचारेण धार्मिकः ।

७ कामक्रोधौ रिपू नित्यं दुनुतो मानवान्खलु ।

८ नाश्नुते मनसः शान्तिं पापकर्मरतो नरः ।

वरील वाक्यांत चिनोति, प्र+आप्नुवन्ति, सुनुमः, शृणोषि, प्र+अहिनोत्, सम्+चिनोतु, दुनुतः व अश्नुते हीं क्रियापदें योजलेलीं आहेत. हीं १-४-६ किंवा १० गणाच्या धातूंच्या रूपासारखीं दिसत नाहींत. त्याचप्रमाणें धातु व प्रत्यय यांमध्यें कांहीं ठिकाणीं 'नो' व कांहीं ठिकाणीं 'नु' आलेला आहे. ज्या प्रत्ययापूर्वी 'नो' आलेला आहे ते 'पित् किंवा विकारक' प्रत्यय व ज्यापूर्वी 'नु' आहे ते 'अपित् किंवा अविकारक' प्रत्यय होत. 'नु' हें पंचम गणाचें विकरण आहे. वरील सर्व क्रियापदें पंचम गणाचीं आहेत.

टीप —धातूला विकरण जोडून प्रत्यय लावण्यापूर्वी जें रूप तयार होतें त्याला 'अंग' म्हणतात. १-४-६-१० गणाच्या धातूंच्या अंगाच्या शेवटीं 'अ' असतो, म्हणून या चार गणांचा प्रथमगणसमूह केलेला आहे. असें—नम, नृत्य, दिश, कथय. २,३,५,७,८ व ९ या गणांच्या धातूंचीं 'अंगें' निरनिराळीं होतात. म्हणून या सहा गणांचा द्वितीयगणसमूह केलेला आहे. द्वितीयगणसमूहाचे प्रत्यय प्रथमगणसमूहाच्या प्रत्ययाहून कांहीं ठिकाणीं भिन्न आहेत. ते पुढें दिले आहेत.

| वर्तमानकाळ | | | | | | प्र. भूतकाळ | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| परस्मैपद | | | आत्मनेपद | | | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
| मि | वस् | मस् | ए | वहे | महे | अम् | व | म | इ | वहि | महि |
| सि | थस् | थ | से | आथे | ध्वे | स् | तम् | त | थास् | आथाम् | ध्वम् |
| ति | तस् | अन्ति | ते | आते | अते | त् | ताम् | अन् | त | आताम् | अत |

| प. पद | आज्ञार्थ | | | आ. पद | | प. पद | विध्यर्थ | | आ. पद | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आनि | आव | आम | ऐ | आवहै | आमहै | याम् | याव | याम | ईय | इवहि | ईमहि |
| हि | तम् | त | स्व | आथाम् | ध्वम् | या | यातम् | यात | ईथा | ईयाथाम् | ईध्वम् |
| तु | ताम् | अन्तु | ताम् | आताम् | अताम् | यात् | याताम् | यु | ईत | ईयाताम् | ईरन् |

वरील प्रत्ययातील जाड अक्षरातील प्रत्यय हे **'पित्'** व इतर **'अपित्'** आहेत.

प्रथमगणसमूहाचे प्रत्यय व वरील प्रत्यय यामध्यें पुढील भेद आहे

१ परस्मैपदामध्यें विध्यर्थी प्रत्यय सर्व निराळे आहेत, आणि आज्ञार्थ द्वि. पु ए. वचनी प्रत्यय 'हि' आहे

२ आत्मनेपदामध्यें तृ पु ब वचनी प्रत्ययामधील अनुनासिकाचा लोप झाला आहे, व द्वितीय आणि तृतीयपुरुषी द्विवचनी प्रत्ययाच्या आरंभी 'इ' नसून 'आ' आहे वर्त. प्रथम पु ए वचनी प्रत्यय ए आहे

**चि ( ५ उ प ) वर्तमानकाळ**

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|
| चिनोमि | चिनुव न्व | चिनुम न्म | चिन्वे | चिनुवहे न्वहे | चिनुमहे न्महे |
| चिनोषि | चिनुथ | चिनुथ | चिनुषे | चिन्वाथे | चिनुध्वे |
| चिनोति | चिनुत | चिन्वन्ति | चिनुते | चिन्वाते | चिन्वते |

**वर्तमानकाळ**

| आप् ( ५ प प. ) | | | अश् ( ५ आ प ) | | |
|---|---|---|---|---|---|
| आप्नोमि | आप्नुव | आप्नुम | अश्नुवे | अश्नुवहे | अश्नुमहे |
| आप्नोषि | आप्नुथ | आप्नुथ | अश्नुषे | अश्नुवाथे | अश्नुध्वे |
| आप्नोति | आप्नुत | आप्नुवन्ति | अश्नुते | अश्नुवाते | अश्नुवते |

**चिनोमि**–चि+नु+मि चि+नो+मि

**आप्नोमि**–आप्+नु+मि–आप्+नो+मि

**नियमः**—पित् प्रत्ययांपूर्वी अंगातील अन्त्य 'उ' चा 'ओ' (गुण) होतो.

**चिनुवहे-न्वहे**—चि+नु+वहे—चि+न्+वहे । **चिनुमः-न्मः**—चि+नु+मः—चि+न्+मः परंतु **आप्नुमः**—आप्+नु+मः । **अश्नुमहे**—अश्+नु+महे.

**नियमः**—व्-म् नें आरंभ होणाऱ्या प्रथमपुरुषी **अपित्** प्रत्ययापूर्वी स्वरान्त धातूंच्या अंगाच्या अन्त्य 'उ' चा विकल्पानें लोप होतो.

**चिन्वन्ति**—चि+नु+अन्ति—चि+न्व्+अन्ति । **आप्नुवन्ति**—आप्+नु+अन्ति—आप्+नुव्+अन्ति ।

**नियमः**—स्वरादि **अपित्** प्रत्ययापूर्वी स्वरान्त धातूंच्या अंगाच्या 'उ' चा 'व्' होतो, आणि व्यंजनान्त धातूंच्या अंगाच्या अन्त्य 'उ' चा 'उव्' होतो.

वरील नियमांस अनुसरून व इतर सामान्य संधिनियमांचा उपयोग करून **चि, आप् व अश्** यांची इतर काळांचीं रूपें पुढीलप्रमाणें होतात.

### चि (५ उ. प.) प्रथम भूतकाळ

| प. पद | | | आ. पद | | |
|---|---|---|---|---|---|
| अचिनवम् | अचिनुव-न्व | अचिनुम-न्म | अचिन्वि | अचिनुवहि-न्वहि | अचिनुमहि-न्महि |
| अचिनोः | अचिनुतम् | अचिनुत | अचिनुथाः | अचिन्वाथाम् | अचिनुध्वम् |
| अचिनोत् | अचिनुताम् | अचिन्वन् | अचिनुत | अचिन्वाताम् | अचिन्वत |

### प्रथम भूतकाळ

| प. पद—आप् | | | आ. पद—अश् | | |
|---|---|---|---|---|---|
| आप्नवम् | आप्नुव | आप्नुम | आश्नुवि | आश्नुवहि | आश्नुमहि |
| आप्नोः | आप्नुतम् | आप्नुत | आश्नुथाः | आश्नुवाथाम् | आश्नुध्वम् |
| आप्नोत् | आप्नुताम् | आप्नुवन् | आश्नुत | आश्नुवाताम् | आश्नुवत |

### आज्ञार्थ

| चि. (५ प. प.) | | | चि. (५ आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| चिनवानि | चिनवाव | चिनवाम | चिनवै | चिनवावहै | चिनवामहै |
| चिनु | चिनुतम् | चिनुत | चिनुष्व | चिन्वाथाम् | चिनुध्वम् |
| चिनोतु | चिनुताम् | चिन्वन्तु | चिनुताम् | चिन्वाताम् | चिन्वताम् |

### आज्ञार्थ

| आप् (५ प. प.) | | | अश् (५ आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| आप्नवानि | आप्नवाव | आप्नवाम | अश्नवै | अश्नवावहै | अश्नवामहै |
| आप्नुहि | आप्नुतम् | आप्नुत | अश्नुष्व | अश्नुवाथाम् | अश्नुध्वम् |
| आप्नोतु | आप्नुताम् | आप्नुवन्तु | अश्नुताम् | अश्नुवाताम् | अश्नुवताम् |

### विध्यर्थ

| चि (५ प. प.) | चि (५ आ. प.) |
|---|---|
| चिनुयाम् चिनुयाव चिनुयाम इ. | चिन्वीय चिन्वीवहि चिन्वीमहि इ. |

आप् (५ प. प.) आप्नुयाम् आप्नुयाव इ. अश् (५ आ. प.) अश्नुवीय अश्नुवीवहि इ.

टीपः—स्वरान्त परस्मैपदी धातूंना आज्ञार्थी द्वि. पु. ए. वचनामध्ये प्रत्यय लागत नाही.

पंचम गणाचे स्वरान्त धातु 'चि' प्रमाणें चालवावे आणि व्यंजनान्त धातु परस्मैपदामध्यें 'आप्' प्रमाणें चालवावे. आत्मनेपदी व्यंजनान्त धातु फक्त 'अश्' हाच आहे. जरूर तेथें विकरणातील 'नु' चा 'णु' करावा.

### पंचमगणाचे धातु

अश् (आ. प.)–व्यापणें, मिळविणें, उपभोगणें
  वि ,, –व्यापणें
आप् (प. प.)–मिळणें, मिळविणें
  प्र ,, –पोंचणें, मिळणें
  वि ,, –व्यापणें
  सम् ,, –संपविणें
चि (उ. प.)–जमविणें
  अप ,, –कमी होणें
  अव, उद्, प्र, सम्, समुद्–जमविणें, एकत्र करणें
  उप (उ. प.)–वाढवणें
  निस् ,, –निश्चय करणें
वि (उ. प.)–जमविणें, शोधणें
दु (प. प.)–पीडा देणें, दुःख देणें
धु-धू (उ. प.)–हालवणें
  अव, वि ,, –अपमान करणें
धृष् (प. प.)–धीर करणें, आव्हान देणें
राध् (प. प.)–सिद्धीस नेणें, प्रार्थना करणें, मारणें
  आ-अनु (प. प.)–प्रार्थना करणें, संतुष्ट करणें
  अप ,, –इजा करणें, मारणें
वृ (उ. प.)–निवडणें, आच्छादणें, वेढणें

अप+आ (उ प )-उघडणें
आ ,, -लपविणें, निग्रह करणें
परि ,, -वेढणें
प्र+आ ,, -पांघरणें, वापरणें
वि ,, -उघडणें, स्पष्ट करणें
सम् ,, लपविणें, झाकणें
शक् ( प. प. )-समर्थ असणें

साध् (प. प.)-साध्य करणें, तडीस नेणें
सु ( उ. प. )-रस काढणें, पिळणें
स्तृ ( उ. प. )-झाकणें, पसरणें
आ, उप, परि, प्र, वि- ,,
हि ( प. प. )-पाठवणें, जाणें
प्र ,, - ,,

## नवीन शब्द

अन्वेषणम्-शोध
अर्थः-द्रव्यम्, धनम्
कदर्यः-कृपण
दुर्गः-म्-किल्ला
नाकः-स्वर्ग
निरागस् (वि.)-निरपराधी

प्रासादः-राजवाडा
सन्तर्पणम्—सन्तोष, समाधान
सर्वात्मना ( तृतीया ए. व. ) पूर्ण उत्साहानें, मन लावून
सोमः-वेदकालीन एका वल्लीचें नाव
शिव (वि.)—शुभ, कल्याणकारक

---

## प्रश्न

१ कंसांतील शब्दांची योग्य रूपें योजून पुढील वाक्यें पुरी करा —

१ सीताया ( भर्तृ ) अर्पयितु शबरी फलानि ( प्र+चि ) ।
२ बालाः गुरूणाम् उपदेशम् ( श्रु ) कल्याणं च ( साध् ) ( आज्ञार्थे ) ।
३ नाकम् * अधिवसतां सुराणां कृते ( ऋत्विज् ) सोमं ( सु-प्र. पु., ना. ) ।
४ नर. ( निरागस् ) प्राणिन: मारणात् मृते न ( दु-विध्यर्थ ) ।
५ केचिन् नरा ( दुष्कर्मन् ) फलम् अस्मिन् एव लोके ( अद् ) ।
६ शिवस्य ( धनुस् ) भङ्क्तुं रामः ( शक् ) ।

७ सैनिकाः दुर्गस्य द्वारम् ( अप+वृ ) दुर्गाधिकारिणं च युद्धे ( धृष् )।

८ रामस्य सहायेन सुग्रीवेण आदिष्टा वानराः सीतां सर्वत्र ( वि+चि )।

९ निशागमे तमः सर्वाः ( दिश् ) ( वि+आप् )।

१० जना. ( धृष् ) रिपूणां प्रतिकारं ( निस्+चि--विध्यर्थ )। -

२ पुढील रूपें ओळखून तीं वाक्यात योजाः—

साध्नुवन्ति। शृण्वन्तु। अशक्नोत्। धुनोति। प्रहिणु।

३ (अ) पित् व अपित् प्रत्यय म्हणजे काय हें सांगून सर्व पित् प्रत्यय लिहा.
(आ) पंचम गणाचें विकरण सांगून प्रश्न २ मधील रूपें सिद्ध करा.

४ पुढील वाक्यातील धातूंना योग्य उपसर्ग जोडून तीं पुरीं कराः—

१ आचार्याः शास्त्राणाम् अर्थम् वृ। २ कन्दर्पः सर्वात्मना अर्थम् चि।
३ रात्रौ सेवकाः प्रासादस्य द्वारम् वृ। ४ दशरथः रामं वनम् हि।
५ अर्जुनः जयद्रथवधम् चि। ६ अर्जुनः भीष्मं शरैः स्तृ।

---

## पाठ ३

### अष्टम गण.

(अ) खाण्डववनदाहाद्रक्षितो मयोऽर्जुनमवदत्। उपकृतोऽस्मि भवता। किं करवाणि भवतः कृते इति। तदा कृष्णेनोपदिष्टोऽर्जुनः प्रत्यभाषत। दिव्यरूपां सभां कुरुष्वेति। तथेत्युक्त्वाऽचिरादेव सभामकरोन्मयः। तत्र भ्रातृभिः सार्धमुपविष्टं युधिष्ठिरं नारदोऽपृच्छत्। किं त्वं राजसूयं यज्ञं न तनोषि। सत्वरं तनुष्व यागम्। एवं त्वं जगति कीर्तिं वितनुया इति। तच्छ्रुत्वा कृष्णस्योपदेशेनैवाहं यज्ञं तनवामित्यमन्यत युधिष्ठिरः। अतः

स कृष्णमपृच्छत् । अप्यहं यज्ञं तनवानि । किं त्वं मनुष इति । श्रीकृष्णः प्रत्यभाषत । जरासन्धादृते [illegible] कोऽप्यन्यस्तव यज्ञे विघ्नं कुर्यात् । तस्य वध आवश्यक इति । अतो भीमो जरासन्धं गदयाऽक्षिणोदमारयच्च । पश्चाद्युधिष्ठिर ऋषिभिर्बन्धुभी राजभिश्च समेतो यज्ञमतनोत् । तदा श्रीकृष्णस्य पूजा शिशुपालस्य न सम्मता । स श्रीकृष्णं युद्धायाह्वयत । श्रीकृष्णस्तं चक्रेणाक्षणोत्तस्य च वधमकरोत् । एवं राजसूययज्ञो निर्विघ्नं समाप्तः ।

वरील उताऱ्यातील अधोरेखित रूपें तन्, क्षण्, क्षिण्, मन्, व कृ या अष्टम गणाच्या धातूंची आहेत. त्यांतील 'कृ' शिवाय इतर धातूंची रूपें पंचम गणाच्या 'चि' धातूच्या रूपासारखी दिसतात.

## पृथक्करण

| पित् प्रत्यययुक्त | अपित् प्रत्यययुक्त |
|---|---|
| अतनोत्-अ+तन्+उ ( ओ )+त् | तनुष्व-तन्+उ+स्व ( ष्व ) १ |
| तशीच अक्षणोत्-अक्षिणोत् | अमनुत-अ+मन्+उ+त |
| तनवानि-तन्+उ(ओ-अव्)+आनि | मनुषे-मन्+उ+से ( षे ) १ |
| तनोषि-तन्+उ ( ओ )+सि ( षि )१ | तनुयाम्-तन्+उ+याम् |

यावरून असें दिसून येईल की अष्टमगणाच्या धातूंना 'उ' [illegible] विकरण प्रत्यय जोडलेलें आहे, व त्यांचीं तनु, मनु, क्षणु व क्षिणु अशीं अंगें झालीं आहेत. हीं अंगें पंचमगणाच्या स्वरान्त धातूंच्या अंगाप्रमाणें असल्यामुळें त्यांचीं रूपें 'चि' धातूच्या रूपाप्रमाणेंच होतात.

### वर्त. तन् ( ८ उ. प. )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|
| तनोमि | तनुव -न्व | तनुम -न्म. | तन्वे | तनुवहे-न्वहे | तनुमहे-न्महे |
| तनोषि | तनुथः | तनुथ | तनुषे | तन्वाथे | तनुध्वे |
| तनोति | तनुतः | तन्वन्ति | तनुते | तन्वाते | तन्वते |

### प्र. भूतकाळ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अतनवम् | अतनुव-न्व | अतनुम-न्म | अतन्वि | अतनुवहि-न्वहि | अतनुमहि-न्महि |
| अतनोः | अतनुतम् | अतनुत | अतनुथाः | अतन्वाथाम् | अतनुध्वम् |
| अतनोत् | अतनुताम् | अतन्वन् | अतनुत | अतन्वाताम् | अतन्वत |

### आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| तनवानि | तनवाव | तनवाम | तनवै | तनवावहै | तनवामहै |
| तनु | तनुतम् | तनुत | तनुष्व | तन्वाथाम् | तनुध्वम् |
| तनोतु | तनुताम् | तन्वन्तु | तनुताम् | तन्वाताम् | तन्वताम् |

### विध्यर्थ

तनुयाम् तनुयाव तनुयाम इ. । तन्वीय तन्वीवहि तन्वीमहि इ.

कृ ( ८ उ. प. ) परस्मैपदी रूपें प्रथम पुस्तकांत दिलेलीं आहेत.

### आत्मनेपदी

| वर्तमानकाळ | | | प्र.भूतकाळ | | |
|---|---|---|---|---|---|
| कुर्वे | कुर्वहे | कुर्महे | अकुर्वि | अकुर्वहि | अकुर्महि |
| कुरुषे | कुर्वाथे | कुरुध्वे | अकुरुथाः | अकुर्वाथाम् | अकुरुध्वम् |
| कुरुते | कुर्वाते | कुर्वते | अकुरुत | अकुर्वाताम् | अकुर्वत |
| आज्ञार्थ | | | विध्यर्थ | | |
| करवै | करवावहै | करवामहै | कुर्वीय | कुर्वीवहि | कुर्वीमहि इ. |
| कुरुष्व | कुर्वाथाम् | कुरुध्वम् | | | |
| कुरुताम् | कुर्वाताम् | कुर्वताम् | | | |

वरील रूपावरून असें दिसून येईल कीं, 'कृ' चें अजादि पित् प्रत्ययापूर्वी 'करो–करव्' असें रूप होतें, व हलादि पित् प्रत्ययापूर्वी 'करो' असें होतें. 'व्–म्' नें आरंभ झालेल्या अपित् प्रत्ययापूर्वी 'कुर्' असें होतें, इतर हलादि अपित् प्रत्ययापूर्वी 'कुरु' असें होतें व अजादि अपित् प्रत्ययापूर्वी 'कुर्व्' असें होतें.

### ५-८ गणाच्या धातूंचीं वर्त. धातु. विशेषणें

(आ) यत्नं कुर्वाणो नरः सम्पदं लभते। यज्ञांस्तन्वानान्देवानपीडयन् राक्षसाः। पुष्पाण्यवचिन्वाना दासी राज्ञ्याऽऽहूता। राज्यं वितन्वता नृपेण शत्रवो निर्जिताः। राज्यं कुर्वति यमे प्रजास्वकालमृत्युर्नाभवत्। विजयं साध्नुवन्तं वीरं जनाः सहर्षमभ्यनन्दन्।

वरील वाक्यांत कुर्वाणः, तन्वानान्, अवचिन्वाना, वितन्वता, कुर्वति व साध्नुवन्तम् ही कृ, तन्, चि व साध् या धातूंची वर्त. धातु. विशेषणें योजलेली आहेत.

कुर्वाण – कुर्वते – अते + आन। चिन्वान – चिन्वते – अते + आन।
कुर्वत् – कुर्वन्ति – अन्ति + अत्। साध्नुवत् – साध्नुवन्ति – अन्ति + अत्।
तन्वान – तन्वते – अते + आन। तन्वत् – तन्वन्ति – अन्ति + अत्।

वरील रूपकरणावरून असें दिसून येईल की ५-८ गणाच्या धातूंची वर्त. धातु. विशेषणें करण्याची रीति १-४-६-१० गणाच्या धातूंच्या रूपांप्रमाणेंच आहे. मात्र आत्मनेपदी धातूंना 'मान' बद्दल 'आन' हा प्रत्यय जोडावा लागतो.

कुर्वत् – पुं.– कुर्वन् कुर्वन्तौ कुर्वन्तः इ., न. कुर्वत् कुर्वती कुर्वन्ति इ., स्त्री. कुर्वती कुर्वत्यौ कुर्वत्यः इ.

परस्मैपदी रूपें 'गच्छत्' प्रमाणें पुंलिंगामध्यें, 'जगत्' प्रमाणें नपुंसकलिंगामध्यें व नपुं. प्रथमा द्विवचनी रूप मूळ शब्द समजून 'नदी' प्रमाणें स्त्रीलिंगामध्यें केलीं जातात.

आत्मनेपदी रूपें अकारान्त विशेषणाप्रमाणें पुं. मध्यें व न. मध्यें अनुक्रमें 'देव व वन' प्रमाणें व 'आ' जोडून स्त्री. मध्यें 'माला' प्रमाणें केलीं जातात.

टीप – वर्त. धातु. विशेषणाच्या उपयोगाकरितां सं.-भाषाप्रदीप-पुस्तक १ पाठ २४ आणि सं.-वाक्यरचना पाठ २६ पहा.

टीप – दिलेल्या गणान्तर्गत आत्मनेपदी धातूंचीं वर्त. धातु. विशेषणें 'आन' हा प्रत्यय जोडून केलीं जातात.

## अष्टमगणाचे धातु

कृ ( उ. प. )–करणें, तयार करणें
अङ्गी-उरी-स्वी–स्वीकारणें
अधि–अधिकार देणें
*अनु ( प. प. )–अनुकरण करणें
अलम्–सुशोभित करणें
आविस्-प्रादुस्–उघड करणें
†उप–उपकार करणें
तिरस्-धिक्–तिरस्कार करणें
नमस्–नमस्कार करणें
प्रति–प्रतिकार करणें, भरपाई करणें
वि + प्र–त्रास देणें
सम् ( संस्करोति )–संस्कार करणें, शुद्ध करणें
क्षण्-क्षिण् ( उ. प. )–इजा करणें, मारणें
तन् ( उ. प. )–पसरणें, तयार करणें, आचरणें
आ-प्र-वि- „
मन् ( आ. प. )–जाणणें, विचार करणें
‡वन् ( आ. प. )–याचना करणें, मागणें

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| आपराह्णिक ( वि. )–दुपार नंतरचें | जरासन्धः–चेदि व मगध देशाचा राजा, कृष्णाचा शत्रु | पूर्वाह्णः–दिवसाचा पहिला भाग |
| क्रतुः ( पुं. )–यज्ञ | दुरुक्तम्–अपशब्द | मञ्जु ( वि. )–गोड |
| खाण्डववनम्–इन्द्राचें आवडतें वन | पात्रम्–योग्य मनुष्य | राजसूयः–यज्ञाचें नांव |

---

* अनु+कृ याचा उपयोग ज्याचें अनुकरण करावयाचें त्याची षष्ठी किंवा द्वितीया योजून करतात.

† उप+कृ याचा उपयोग ज्यावर उपकार करावयाचा त्याची षष्ठी योजून करतात.

‡ हा धातु 'याच्' प्रमाणें द्विकर्मक आहे.

## प्रश्न

१ कंसातील धातूंची योग्य तीं रूपें योजून पुढील वाक्यें पुरीं कराः—

१ वसिष्ठेन आदिष्टः दशरथः पुत्रप्राप्तये यज्ञम् ( तन् ) ।

२ पात्रेभ्यः दानं नरस्य कीर्तिं ( वि + तन् ) ।

३ जयद्रथः पादप्रहारेण अभिमन्युम् ( क्षिण् ) ।

४ नरः मित्राणां हृदयानि दुरुक्तैः न ( क्षण्—विध्यर्थ ) ।

५ वर्षासु चातकः श्यामान् मेघान् जलं ( याच् ) ।

६ दरिद्रः नरः भिक्षा ( याच् ) गृहात् गृहं भ्रमति ।

७ कार्यस्य आरम्भं ( कृ ) नरेण परिणामः विचारणीयः ।

८ जाबालेः आश्रमे मुनयः पुण्याः कथाः ( श्रु ) न्यषीदन् ।

९ व्याधः खगानां ग्रहणाय भूमौ जालं ( वि + तन् ) ।

१० श्वः कार्यम् अद्य ( कृ—विध्यर्थ ) पूर्वाह्णे च आपराह्णिकम् ।

२ पुढील धातूंची वर्त. धातु. विशेषणें तयार करून त्यांची योग्य रूपें पुढील वाक्यांत योजाः—

उप + कृ, कृ, सम् + चि, आविस् + कृ, वि + स्तृ.

१ मधु ——— मधुकराः मधु गुञ्जन्ति ।

२ अन्यस्य दोषान् एव ——— नरस्य लघुत्वं दृश्यते ।

३ शास्त्रार्थं सम्यक् ——— आचार्यान् सम्मानयन्ति छात्राः ।

४ पापं ——— नराणां चित्तं शङ्कितं वर्तते ।

५ दीनानाम् ——— जनैः पुण्यं लभ्यते ।

३ 'कृ' धातूला निरनिराळे पांच उपसर्ग लावून वाक्यांत उपयोग करा.

# पाठ ४

## स्वरान्त नामें ( अनियमित ).

(अ) यदा यदा भू राक्षसैः पीडिताऽभवत्तदा तदा सा गोरूपेण द्यां गत्वा श्रियो भर्तारं विष्णुं राक्षससंहारं प्रार्थयत । विष्णुरपि विविधै रूपैर्द्योरवातरद् भुवं दुष्टानां दण्डनाय । एवं रामरूपेण स रावणस्यान्येषां च राक्षसानां संहाराय भुवि रघुकुले जातः । राज्यश्रिया भुवो भर्ता रामो गर्वितो नाभवत् । स प्रजानां हितायैव प्रावर्तत । प्रजाभिरनुभूतं सुखं दिव्यपि दुर्लभम् ।

वरील उताऱ्यात श्री, भू , गो व द्यो या नामांची निरनिराळी रूपें योजलेली आहेत. हे शब्द चालवितांना व्यंजनान्त नामांना लागणारे प्रत्ययच बहुधा योजले जातात. परंतु यांची कांही रूपें अनियमित आहेत. म्हणून त्यांची सर्व रूपें खालीं दिलीं आहेत.

टीपः—प्रत्ययः—स् औ अस् प्र., अम् औ अस् द्वि., आ भ्याम् भिस् तृ., ए भ्याम् भ्यस् च., अस् भ्याम् भ्यस् पं., अस् ओस् आम् ष., इ ओस् सु स.,—औ अस् स.

श्री ( स्त्री. )-लक्ष्मी, सम्पत्ति, सौन्दर्य                भू ( स्त्री. )-पृथ्वी.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| श्रीः | श्रियौ | श्रियः | प्र. सं. | भूः | भुवौ | भुवः |
| श्रियम् | ,, | ,, | द्वि. | भुवम् | ,, | ,, |
| श्रिया | श्रीभ्याम् | श्रीभिः | तृ. | भुवा | भूभ्याम् | भूभिः |
| श्रिये-श्रियै | ,, | श्रीभ्यः | च. | भुवे-वै | ,, | भूभ्यः |
| श्रियः-श्रियाः | ,, | ,, | पं. | भुवः-वाः | ,, | ,, |
| ,, ,, | श्रियोः | श्रियाम्-श्रीणाम् | ष. | ,, ,, | भुवोः | भुवाम्-भूनाम् |
| श्रियि-याम् | ,, | श्रीषु | स. | भुवि-वाम् | ,, | भूषु |

धी—बुद्धि, ह्री—लाज, भी—भीति हे 'श्री'प्रमाणें व भ्रू ( भुवई ) हा 'भू' प्रमाणें चालवावा.

**द्यो** ( स्त्री. )–आकाश, स्वर्ग | द्दिव् ( स्त्री. )–आकाश, स्वर्ग

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| द्यौ | द्यावौ | द्याव | प्र. सं. | द्यौः | दिवौ | दिवः |
| द्याम् | ,, | द्या | द्वि. | दिवम् | ,, | ,, |
| द्यवा | द्योभ्याम् | द्योभि | तृ. | दिवा | द्युभ्याम् | द्युभि |
| द्यवे | ,, | द्योभ्य | च. | दिवे | ,, | द्युभ्य |
| द्यो | ,, | ,, | पं. | दिव | ,, | ,, |
| ,, | द्यवो | द्यवाम् | ष. | ,, | दिवो | दिवाम् |
| द्यवि | ,, | द्योषु | स. | दिवि | ,, | द्युषु |

**गो** ( पु )–बैल व ( स्त्री. )–गाय, पृथ्वी, इन्द्रिय हा शब्द 'द्यो' प्रमाणें चालवावा.

(आ) भुवः <u>पत्युः</u> श्रीरामस्य भार्या सीता <u>स्त्रीषु</u> रत्नमासीत् । सा लङ्कायाः <u>पत्या</u> रावणेनापहृता । अतो रामेणात्मनः <u>स्त्रिया</u> अन्वेषणाय सुग्रीवेण सह सख्यं कृतम् । रामस्य सखा सुग्रीव स्तस्य साहाय्यमकरोत् । रावणं हत्वा सीतां च गृहीत्वा रामः पुष्पकविमानेन सर्वैः सखिभिर्गन्धर्वैश्च सहायोध्या निवृत्तः । पश्चाद् भुवः <u>पतिः</u> श्रीरामो नयेन राज्यं कृत्वा <u>स्त्रीणा</u> श्रेष्ठया सीतया सह सुखमन्वभवत् ।

वरील उताऱ्यांत पति, सखि व स्त्री या नामांची रूपें आलेली आहेत. त्यांची रूपें पुढीलप्रमाणें होतात

**पतिः** (पु )–नवरा, स्वामी | **स्त्री** ( स्त्री. )

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पतिः | पती | पतय | प्र. | स्त्री | स्त्रियौ | स्त्रिय |
| पतिम् | ,, | पतीन् | द्वि. | स्त्रियम्–स्त्रीम् | ,, | स्त्रिय –स्त्री |
| पत्या | पतिभ्याम् | पतिभि | तृ | स्त्रिया | स्त्रीभ्याम् | स्त्रीभिः |
| पत्ये | ,, | पतिभ्यः | च. | स्त्रियै | ,, | स्त्रीभ्य |
| पत्यु | ,, | ,, | पं. | स्त्रियाः | ,, | ,, |
| ,, | पत्यो | पतीनाम् | ष. | ,, | स्त्रियो | स्त्रीणाम् |
| पत्यौ | ,, | पतिषु | स. | स्त्रियाम् | ,, | स्त्रीषु |
| पते | पती | पतय | सं. | स्त्रि | स्त्रियौ | स्त्रिय |

**सखि** (पुं.)–मित्र या शब्दाचीं प्रथमा, द्वितीया व संबोधन यांचीं रूपें सखा सखायौ सखाय प्र. । सखायम् सखायौ सखीन् द्वि । सखे सखायौ सखाय: सं. । अशीं होतात व इतर विभक्तींचीं 'पति' प्रमाणें होतात.

सखी (स्त्री)–मैत्रिण हा शब्द 'नदी' प्रमाणें चालवावा.

टीप —'पति' शब्द समासांत शेवटीं आला तर तो 'कवि' प्रमाणें चालवावा जसें भूपति, अधिपति. सीता लक्ष्मणपतिना रावणेनापहृता ।

(ङ) जरया जरसा वाऽऽक्रान्तस्य नरस्याक्षिणी मन्दे भवतः ।
केचिज्जरा एकेनैवाक्ष्णा द्रष्टुं समर्थाः सन्ति ।
जरायां–जरसि वा नराणां गात्राणि विकलानि भवन्ति ।
अक्ष्णोस्तेजसा नरस्य चातुर्यं ज्ञायते ।

वरील वाक्यात जरा व अक्षि या शब्दाचीं रूपें आलीं आहेत.

जरा (स्त्री)–म्हातारपण, वार्धक्य

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| जरा | जरे-जरसौ | जरा -जरस | प्र. | जराया -जरस | जराभ्याम् | जराभ्य | पं. |
| जराम्-जरसम् | ,, | ,, | द्वि. | ,, | जरयो -जरसो | जराणाम् जरसाम् | ष |
| जरया-जरसा | जराभ्याम् | जराभि | तृ. | जरायाम्-जरसि | ,, | जरासु | स. |
| जरायै-जरसे | ,, | जराभ्य | च. | जरे | जरे-जरसौ | जरा -जरस | सं. |

'जरा' शब्द 'माला' प्रमाणें चालवतात, मात्र स्वरारंभी प्रत्ययापूर्वी 'जरस्' असा समजून 'चन्द्रमस्' प्रमाणें रूपें केलीं जातात.

'निर्जरः (पु)–देव' हा शब्द सुद्धां 'देव' प्रमाणें चालवून शिवाय स्वरारंभी प्रत्ययापूर्वी 'निर्जरस्' समजून रूपें केलीं जातात. 'अजर (वि.)–म्हातारपण नसलेला' शब्दहि वरीलप्रमाणें विकल्पानें रूपें करून चालवतात.

आक्षि (न.)—डोळा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अक्षि | अक्षिणी | अक्षीणि | प्र. | अक्ष्ण | | अक्षिभ्याम् | अक्षिभ्य | पं. |
| ,, | ,, | ,, | द्वि. | ,, | | अक्ष्णो | अक्ष्णाम् | ष. |
| अक्ष्णा | अक्षिभ्याम् | अक्षिभि | तृ. | अक्ष्णि–अक्षणि | | ,, | अक्षिषु | स. |
| अक्ष्णे | ,, | अक्षिभ्य | च. | अक्षे–अक्षि | | अक्षिणी | अक्षीणि | सं. |

दधि (न.)–दही, अस्थि (न.)–हाड, सक्थि (न.)–मांडी हे शब्द अक्षि प्रमाणें चालवतात.

## नवीन शब्द

**अन्तरालम्**-पृथ्वी व स्वर्ग यामधील जागा
**अवनत** (अव+नम् चें कर्मणि भू. धा. वि.)-वाकलेला
**अवस्थानम्**-राहणें
**उद्भूत** (उद्+भू चें कर्म. भू. धा. वि.)-उत्पन्न झालेला
**किमुत** (अव्यय)-किती ज्यास्त-कमी
**तृणबिन्दुः** (पुं.)-ऋषीचें नाव
**त्रिशङ्कुः** (पुं.)-सूर्यवंशातील राजा
**नयः**-नीति
**फलोदयः**-फलाचा लाभ
**ययातिः**-चन्द्रवंशातील राजा
**वि+सृज्** (६ प. प.)-सोडणें, पाठविणें
**विसृष्ट** (वि+सृज् चें क. भू. धा. वि.)-सोडलेला
**वेणुः** (पुं.)-पावा, बाम्बूची काटी
**वैतरणी**-पाताळातील नदीचें नाव
**शक्रः**-इन्द्रः
**सहोदरः**-सख्खा भाऊ

---

### प्रश्न

१ गवाम्, अक्षीणि, सखिषु, भुवि व जरायाम् ही रूपें ओळखून त्याचा वाक्यांत उपयोग करा.

२ पुढील वाक्यांत कंसांतील शब्दांची योग्य रूपें योजाः—

१ वेणुं नादयन् कृष्णः (गो) सर्वदा परिवृतः अभवत् ।
२ ऋष्यशृङ्ग (दृश्) नाम्नः अपि अपरिचितः । किमुत दर्शनस्य ।
३ एकदा केचित् मूर्खपण्डितैः (अस्थि) समाय. दृष्टः ।
४ (दधि) युक्तम् अन्नं प्रवासकाले अतीव उपयुक्तं भवति ।
५ यथा पुत्रेण तथा (पति) वियोगं न सहन्ते (स्त्री) ।
६ नरस्य (भ्रू) भङ्ग. मनसः क्षोभं सूचयन्ति ।
७ पुरा ब्राह्मणाः (भू) सुरा इव मताः ।
८ त्रिशङ्कु (द्यो) न गतः किन्तु अन्तराले स्थित. ।
९ सदा (अजर) भवितव्यम् इति ययातेः इच्छा ।
१० क्षीरसागरात् उद्भूतया (श्री) सहोदरेभ्यः दुर्गुणाः शिक्षिता. ।

३ पुढील वाक्यातील जाड अक्षरातील शब्दांबद्दल या घड्यातील शब्द योजा —

१ कपिञ्जल अवदत् मित्र पुण्डरीक न एतद् युक्त ज्ञानिन तव ।
२ रावणेन देवाः अपि स्वप्रासादे दासत्व नीता ।
३ सूर्य सहस्रेण नयनैः पृथ्वीं प्रकाशयति ।
४ तृणबिन्दो भयेन शक्र हरिणीं नाम सुराङ्गना तस्य तपस भङ्गाय व्यसृजत् ।
५ यथा नारीणां तथा वाचा साधुत्वे दुर्जन जन ।
६ बुद्धेः प्रकर्ष महते फलोदयाय कल्पते ।
७ अर्जुन रणाङ्गणे मित्राणि बान्धवान्गुरून् च युद्धाय उद्यतान् अपश्यत् ।
८ जना धेनूनां प्रदान कुर्वन्ति वैतरण्या पार गन्तुम् ।
९ साहस विना सम्पदः लाभ अशक्य इति केचित् मन्यन्ते ।
१० लज्जया आक्रान्तस्य नरस्य मुखम् अवनत भवति ।

---

# पाठ ५

## नवम गण.

( अ ) आसीत्कस्यापि वणिजोऽश्वविपणिर्हयग्रामे। सोऽश्वान् क्रीणाति कुटुम्बं चापुष्णात् । बहवो जना अश्वानक्रीणंस्तस्माद्विपणिकात् । एकदा स सुलक्षणाढ्यं हयं विक्रयार्थमापणं नीत्वा तं स्तम्भेऽबध्नात् । तदैव प्रातस्तत्र कोऽपि राजकुमारः। सोऽश्वानां लक्षणानि सम्यगजानात् । अश्वस्य रूपेणाकृष्टः स तमवदत् । भो वणिक् क्रीणामि हयमिममहम् । किमस्य मूल्यमिति । तदा स वणिगवदत् । परीक्ष्यैव क्रीणातु भवानिति । तदा स राजपुत्रो जानाम्यहमश्वपरीक्षां रश्मीन्ददं

गृह्णामि पश्चात्तमारोहामीत्युक्त्वा रश्मीनगृह्णादारोहच्च । एतद् दृष्ट्वा सोऽश्वविक्रय्यमन्यत । अयं सम्यग्जानात्यश्वपरीक्षाम् । विक्रीणीयेमं सुवर्णशतेनेति । अत्रान्तरे राजपुत्रोऽपृच्छत् कियता *मूल्येन विक्रीणीषे त्वमिमं हयम् । बहु रोचतेऽयं मह्यमिति । तदा स वणिगवदत्सुवर्णशतेनेति । स राजपुत्रो मूल्यं दत्त्वा हयमक्रीणात्प्रासादं च न्यवर्तत ।

वरील उताऱ्यातील अधोरेखित क्रियापदाचें पुढीलप्रमाणें पृथक्करण करता येईल.

| 'पित्' प्रत्यययुक्त | 'अपित्' प्रत्यययुक्त |
| --- | --- |
| अपुष्णात् – अ + पुष् + ना (णा) + त् | विक्रीणीषे – वि + क्री + ना (नी–णी) + षे |
| क्रीणामि – क्री + ना (णा) + मि | विक्रीणीय – वि + क्री + ना (न्–ण्) + ईय |
| अबध्नात् – अ + बन्ध् (बध्) + ना + त् | व्यक्रीणीत – वि + अ + क्री + ना (नी –णी) + त |
| क्रीणातु – क्री + ना (णा) + तु | अक्रीणन् – अ + क्री + ना (न्–ण्) + अन् |

यावरून असें दिसून येईल की 'ना' हें नवम गणाचें विकरण आहे. पित् प्रत्ययांपूर्वी 'ना' च राहिला आहे. हलादि अपित् प्रत्ययांपूर्वी 'ना' चें 'नी' असें रूपांतर झालें आहे व अजादि अपित् प्रत्ययांपूर्वी 'ना' चें 'न्' असें रूपांतर झालें आहे. जरूर तेथे 'न्' चा 'ण्' केलेला आहे.

क्री (उ. प.) वर्तमानकाळ

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| क्रीणामि | क्रीणीवः | क्रीणीमः | क्रीणे | क्रीणीवहे | क्रीणीमहे |
| क्रीणासि | क्रीणीथः | क्रीणीथ | क्रीणीषे | क्रीणाथे | क्रीणीध्वे |
| क्रीणाति | क्रीणीतः | क्रीणन्ति | क्रीणीते | क्रीणाते | क्रीणते |

* 'वि + क्री' हा धातु आत्मनेपदी आहे. [illegible] अथवा [illegible] व्यापाराचे जे [illegible] शब्द [illegible].

## प्र. भूतकाळ

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|
| अक्रीणाम् | अक्रीणीव | अक्रीणीम | अक्रीणि | अक्रीणीवहि | अक्रीणीमहि |
| अक्रीणाः | अक्रीणीतम् | अक्रीणीत | अक्रीणीथाः | अक्रीणाथाम् | अक्रीणीध्वम् |
| अक्रीणात् | अक्रीणीताम् | अक्रीणन् | अक्रीणीत | अक्रीणाताम् | अक्रीणत |

## आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| क्रीणानि | क्रीणाव | क्रीणाम | क्रीणै | क्रीणावहै | क्रीणामहै |
| क्रीणीहि | क्रीणीतम् | क्रीणीत | क्रीणीष्व | क्रीणाथाम् | क्रीणीध्वम् |
| क्रीणातु | क्रीणीताम् | क्रीणन्तु | क्रीणीताम् | क्रीणाताम् | क्रीणताम् |

## विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| क्रीणीयाम् | क्रीणीयाव इ. | क्रीणीय | क्रीणीवहि इ. |

वरील रूपांकरिता 'क्री' धातूचीं पुढीलप्रमाणें अंगें होतात. **पित्** प्रत्यया-पूर्वी-**क्रीणा, हलादि अपित्** प्रत्ययापूर्वी-**क्रीणी** व **अजादि अपित्** प्रत्ययापूर्वी-**क्रीण्**. यावरून कोणत्याहि नवम गणाच्या धातूचीं वरीलप्रमाणें तीन अंगें बनवलीं म्हणजे रूपें करता येतील.

**ज्ञा** (जा)—जाना–जानी–जान्। **पुष्**—पुष्णा–पुष्णी–पुष्ण्।
**ग्रह्** (गृह्)—गृह्णा–गृह्णी–गृह्ण्। **बन्ध्** (बध्)—बध्ना–बध्नी–बध्न्।

नवम गणाच्या धातूंचे तीन प्रकार होतात —

१ फरक न होणारे.—

**अश्** (प. प.)–खाणें; प्र+अश्–पिणें
**क्री** (उ. प.)–विकत घेणें
**परि+क्री** (आ. प.)–वेतन देऊन घेणें, फेडणें
**वि+क्री** (आ. प.)–विकणें
**निस्+क्री** (निष्क्री –उ. प.)–पैसे देऊन सोडवणें
**क्षुभ्** (प. प.)–प्रक्षुब्ध होणें, चवताळणें
**पुष्** (प. प.)–पोसणें
**प्री** (उ. प.)–संतुष्ट करणें
**मुष्** (प. प.)–चोरणें
**मृद्** (प. प.)–चेंगरणें, चुराडा करणें

टीपः—क्षुभ् याचीं अंगें क्षुभ्ना–क्षुभ्नी–क्षुभ्न् अशींच होतात. 'न्'चा 'ण्' होत नाहीं.

२ अन्त्य दीर्घ स्वर ह्रस्व होणारे.—

कॄ (उ. प.)-ठार मारणें, इजा करणें
जॄ (प. प.)-वृद्ध होणें, क्षय होणें
दॄ (वि. प. प.)-फाडणें, फोडणें
धू (उ. प.)-हालणें, हालवणें
पू (उ. प.)-पवित्र करणें
पॄ (प. प.)-भरणें, रक्षण करणें
ली (प. प.)-वितळणें, चिकटणें

प्र+ली-एकरूप होणें
वि+ली-वितळणें
लू (उ. प.)-तोडणें, खुडणें
वि, प्र+लू- ,, ,,
वॄ (उ. प.)-निवडणें
शॄ (वि-प. प.)-तुकडे करणें, उभें फाडणें
स्तॄ (उ. प.)-आच्छादणें, पसरणें

३ अनियमित फरक होणारे:—

ग्रन्थ् (ग्रथ्-प. प.)-जोडणें, ओवणें
ग्रह् (गृह्-उ. प.)-घेणें, पकडणें
अनु-अनुग्रह करणें
उद्-उचलणें
नि-नियमन करणें
प्रति-स्वीकारणें, घेणें
वि-भांडणें
सम्-जमविणें
मन्थ् (मथ्-प. प.)-घुसळणें
ज्ञा (जा-उ. प.)-जाणणें

अनु-परवानगी देणें
अभि, प्रत्यभि-ओळखणें, आणणें
अव-अपमान करणें
*प्रति-प्रतिज्ञा करणें, कबूल करणें
बन्ध् (बध्-प. प.)-बांधणें
अनु-आग्रह धरणें, अनुसरणें
निर्-आग्रह धरणें
नि-पद्य बांधणें, रचणें
स्तम्भ् (स्तभ्-प. प.)-आधार देणें, अडविणें, गर्विष्ठ होणें

टीपः—आज्ञार्थी द्वितीयपुरुषी एकवचनी प्रत्यय परस्मैपदी व्यंजनान्त धातूंना 'आन' असा लागतो व तो लागताना 'ना' हें विकरण जोडीत नाहीत. मात्र जरूर तेथें 'न्' चा 'ण्' करावा.

अश्-अशान, क्लिश्-क्लिशान, ग्रन्थ्-ग्रथान, बन्ध्-बधान, मन्थ्-मथान, मुष्-मुषाण, पुष्-पुषाण, स्तम्भ्-स्तभान, मृद्-मृदान.

---

* 'प्रति+ज्ञा' या धातूचा उपयोग ज्याच्या जवळ प्रतिज्ञा करावयाची त्याची चतुर्थी योजून करतात.

(आ) ईशतत्त्वं जानन्तः-जानानाः ये नराः संसारभावेभ्यः विरक्ताः भवन्ति ।

स्वप्रभया राज्ञां मनांसि चक्षूंषि च मुष्णती दमयन्ती रङ्गं प्रविष्टा ।
क्षीरसागरं मथ्नद्भिः सुरासुरैः चतुर्दश रत्नानि लब्धानि ।
पाप्मनः पुनाना भागीरथी भक्तैः स्तूयते ।

वरील वाक्यात अधोरेखित शब्द वर्त. काल. धातु. विशेषणें आहेत. जानन्तः, मुष्णती व मथ्नद्भिः हीं परस्मैपदी आणि जानानाः व पुनाना हीं आत्मनेपदी धातूंचीं आहेत. तीं बनविण्याची व चालविण्याची त-हा पंचम किंवा अष्टम गणाच्या वर्त. धातु. विशेषणासारखीच आहे.

ज्ञा – जानन्ति – अन्ति + अत् – जानत् पुं. प्र. ब. व.–जानन्तः
मन्थ् – मथ्नन्ति – अन्ति + अत् – मथ्नत् पुं. तृ. ब. व.–मथ्नद्भिः
मुष् – मुष्णन्ति – अन्ति + अत् – मुष्णत् स्त्री. प्र. ए. व.–मुष्णती
ज्ञा – जानते – अते + आन – जानान पुं. प्र. ब. व.–जानानाः
पू – पुनते – अते + आन – पुनान स्त्री. प्र. ए. व.–पुनाना

## नवीन शब्द

| | | |
|---|---|---|
| अङ्गुलीयकम्–आंगठी | दधि (न.)–दहीं | रङ्गः–सभामण्डप |
| अध्वगः–प्रवासी, वाटसरू | धीवरः–कोळी | रन्ध्रम्–कमीपणा, दोष |
| अश्वविपणिः (पु.)–घोडे विकण्याचें दुकान | नवनीतम्–लोणी | रश्मिः (पुं.)–लगाम |
| आढ्य (वि.)–संपन्न, युक्त | निष्कः–ष्कम्–सोन्याचें नाणें | वणिज् (पुं.)–वाणी |
| आपणः–णम्–बाजार, दुकान | परोक्षम् (अ.)–दृष्टीआड | विपणिकः–दुकानदार |
| केसरः–आयाळ | पाप्मन् (पु.) पापी मनुष्य | विमृश्यकारिन् (वि.)–विचार करून वागणारा |
| | प्रभञ्जनः – सोसाट्याचा वारा | स्तम्भः–खांब |

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील शब्दांचीं योग्य तीं रूपें योजा —

१ (अनु+ज्ञा) मा तात गमनाय इति चन्द्रापीड पितर (प्र+अर्थ्)।
२ धीवरेण आनीतम् अङ्गुलीयक दुष्यन्त (अभि+ज्ञा) शकुन्तलाया *च
३ दधि (मन्थ्) गोपीना परोक्षं नवनीत (मुष्) कृष्ण । [अस्मरत्।
४ कालिदास शकुन्तलाम् उद्दिश्य नाटक (नि+बन्ध्)।
५ शत्रो रन्ध्राणि (ज्ञा) नृपेण विजय लब्ध ।
६ ग्रीष्मकाले सूर्यातपेन तप्त हिम (वि+ली)।
७ प्रभञ्जन गुल्मान् वृक्षान् अपि (धू) उन्मूलयति च।
८ विष्णो नामस्मरण पापिन (तॄ) (पू)।
९ अरण्ये व्याघ्रा मार्गेण गच्छत अध्वगान् (वि+द्रु)।
१० (मृ) हि विस्मयकारिणि गुणलुब्धा स्वयमेव सम्पद ।

२ पुढील रूपें ओळखून त्यांचें पृथक्करण करा व तीं वाक्यांत योजा —
व्यक्रीणत । दधान । अप्रीणन् । आध्यात् । निगृह्णन्तु । पुनीत ।

३ पुढील वाक्यांत कंसांतील धातूला योग्य ते उपसर्ग जोडून त्यांचीं रूपें योजा —

१ राक्षसा परस्पर —— (प्रह्)। २ स्वामी निष्कदशकेन भृत्य —— (क्री)।
३ बाल अनुज्ञा लब्धु मातरम् —— (प्रच्छ्)। ४ पुन पित्रा कृतम् ऋण —— (श्री)।
५ मूषक सिंहस्य केसर —— (छ)। ६ साधव दीनान् —— (ग्रह्)।

४ पुढील वाक्यांतील ल्यबन्त अव्ययांबद्दल क्रियापदांचीं रूपें योजा —

वृद्धस्य दारा आन्द्य पाठिक गृह गच्छतु । मालाकार माला ग्रथित्वा स्वामिने अयच्छत् । जना घोष निरुध्य स्वास्थ्य लभेरन् । चोरा शद्गान् पूर्वा युद्धमारभन्ताम् । व्याध तण्डुलानाम् उपरि जाल विस्तीर्य दूरे एव स्थित ।

* 'स्मृ-(ओळखणें) आठवण होणें' या अर्थी कर्माची आठवण व्हावयाची त्या कर्माच्या ठिकाणी षष्ठी योजतात

# पाठ ६

## व्यंजनान्त शब्द (अनियमित).

(अ) १ पुंसामसमर्थानामुपद्रवायात्मनो भवेत्कोपः ।
२ सहते क्लेशबाहुल्यं सर्वदा धैर्यवान्पुमान् ।
३ सन्तार्यते सुखेनैव धीरैः पुम्भिर्भवोदधिः ।
४ धर्म्यं पन्थानमुत्सृज्य नरो भवति दुःखभाक् ।
५ आपदां कथितः पन्था इन्द्रियाणामसंयमः ।
६ न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ।
७ सम्पूज्यते जनैः श्वाऽपि धनिकस्य गृहे स्थितः ।
८ मकरः प्रच्युतः स्थानाच्छुनापि परिभूयते ।
९ व्याधो विध्यति बाणेन श्वभिः परिवृतं मृगम् ।

वरील वाक्यांत पुंस्, पथिन् व श्वन् या शब्दांची निरनिराळी रूपें आलीं आहेत. त्यांचीं सर्व रूपें पुढें दिलीं आहेत.

### पुंस् (पुं.)—पुरुष

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पुमान् | पुमांसौ | पुमांसः | प्र. | पुंसः | पुम्भ्याम् | पुम्भ्यः | पं. |
| पुमांसम् | ,, | पुंसः | द्वि. | ,, | पुंसोः | पुंसाम् | ष. |
| पुंसा | पुम्भ्याम् | पुम्भिः | तृ. | पुंसि | ,, | पुंसु | स. |
| पुंसे | ,, | पुम्भ्यः | च. | पुमन् | पुमांसौ | पुमांसः | सं. |

वरील रूपांवरून व्यंजनान्त नामाच्या रूपांचे तीन विभाग करतां येतात. १ प्रथमा, सम्बोधन व द्वितीया ए. व. आणि द्वि व., २ द्वि बहुवचनापासून पुढील स्वरारंभी प्रत्यय, ३ व्यंजनारंभी प्रत्यय. म्हणून कोणत्याहि शब्दाचीं प्रथमेचीं सर्व रूपें, द्वितीया व संबोधन एकवचन, द्वितीयेचें बहुवचन, तृतीयेचें द्विवचन व सप्तमी बहुवचन एवढीं रूपें दिलीं म्हणजे इतर रूपें सहज तयार करतां येतील.

### पथिन् (पु.)—मार्ग

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पन्था | पन्थानौ | पन्थान | प्र. सं. | पथ | पथिभ्याम् | पथिभ्य | पं. |
| पन्थानम् | ,, | पथ | द्वि. | पथ | पथो | पथाम् | ष. |
| पथा | पथिभ्याम् | पथिभि | तृ. | पथि | पथो | पथिषु | स. |
| पथे | ,, | पथिभ्य | च. | | | | |

'पथिन्' प्रमाणें मथिन् (पु)—'घुसळण्याची रवी' हा शब्द चालवावा. ऋभुक्षिन् (पु)—इन्द्र हा शब्दहि 'पथिन्' प्रमाणें चालवावा. मात्र प्रथमा, संबोधन आणि द्वितीया एकवचन व द्विवचन यामध्यें अनुनासिक नसतें

| | | | |
|---|---|---|---|
| ऋभुक्षा | ऋभुक्षाणौ | ऋभुक्षाण | प्र. |
| ऋभुक्षा | ,, | ,, | स |
| ऋभुक्षाणम् | ऋभुक्षाणौ | ऋभुक्ष | द्वि |

### श्वन् (पु)—कुत्रा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| श्वा | श्वानौ | श्वान | प्र. | शुन | श्वभ्याम् | श्वभ्य | पं. |
| श्वानम् | ,, | शुन | द्वि. | ,, | शुनो | शुनाम् | ष. |
| शुना | श्वभ्याम् | श्वभि | तृ. | शुनि | शुनो | श्वसु | स. |
| शुने | श्वभ्याम् | श्वभ्य | च. | श्वन् | श्वानौ | श्वान | सं. |

'श्वन्' प्रमाणें युवन् (पु)—तरुण मनुष्य व मघवन् (पु)—इन्द्र हे शब्द चालवावे मात्र द्वितीयाबहुवचनापासून स्वरारंभी प्रत्ययापूर्वी यून् व मघोन् अशी रूपें होतात यून्+अस्–यून, मघोन्+अस्–मघोन

श्वन् चें स्त्रीलिंगी रूप शुनी, युवन् याचें यूनी व मघवन् याचें मघोनी अशी होऊन 'नदी'प्रमाणें चालविली जातात 'युवन्' याचीं युवतिः व युवती अशीहि होतात, परंतु युवतिः हें ज्यास्त प्रचारांत आहे

(आ) १ दुर्योधनेन सैन्यस्य कर्णो धुरि नियोजितः ।

२ न भवन्ति हि साधूनां कदाप्यचितया गिरः ।

३ देशान्तरं प्रतिष्ठेरञ्जुमेऽहनि सदा नरः ।

४ अहानि नव रामस्य क्रियते जननोत्सव. ।

महारथ —१०००० योद्ध्यांबरोबर लढणारा वीर
महोषरम्—मोठें वाळवंट
मातुल —मामा
माया—कपट
मिथ्यावादिन् (वि )—खोटें बोलणारा
मिष्ट (वि )—रुचकर
मुक्ता—मोती
मुमुक्षु (पु )—मोक्षाची इच्छा करणारा
मृग् (१० आ प.)—पारध करणें, शोधणें
मृग —पशु, हरिण
मृधम्—युद्ध

य

यज्ञवाट —यज्ञाची राखून ठेवलेली जागा
यक्षेश्वर —यक्षांचा अधिपति
यदृच्छया (अव्यय)—सहजगत्या
यमसादनम्—यमाचें घर
याजक —यज्ञ करविणारा
यात्रा—स्वारी
याज्ञसेनी—द्रौपदी
युगपद् (अव्यय)—एकदम
यूथम्—कळप
योषित् (स्त्री )—स्त्री

रहस्—गुप्त गोष्ट
राजकुलम्—राजाची न्यायसभा
राजर्षभ —श्रेष्ठ राजा
राजीवम्—कमळ
रामणीयकम्—सौन्दर्य
रिक्त (रिच्—र. भू धा वि )—रिकामा
रुचिर (वि.)—सुन्दर, तेजस्वी
रुधिरम्—रक्त

ल

लक्ष्यम्—नेम धरलेली गोष्ट
लग्न (लग्—क भू धा वि )—अडक- लेलें, जोडलेलें
लघुत्वम्—कमीपणा
लालसा—इच्छा
लीला—सोपपणा
लोहम्—लोखंड

व

वक्त्रम्—तोंड
वणिज् (पु )—वाणी, व्यापारी
वत्सल (वि.)—प्रेमळ
वन् (८ आ प )—याचना करणें
वनान्त —रानाचा हद्दीकडचा भाग
वनोद्देश —रानाचा एक भाग
वर (वि.) श्रेष्ठ
वरारोहा (वि )—सुंदर मांड्या अस-

वशिन्—वशी-यति
वसनम्—वस्त्र
वाजिन् (पु)—घोडा
वासव —इन्द्र
वासिष्ट —वसिष्ठाचा मुलगा
विकृष्यमाण (वि+कृष्–कर्मणि वर्त धा. वि)—ओढला जाणारा
विग्रह —भाडण
विचक्षण —शहाणा मनुष्य, विद्वान्
विनीवित (वि)—जीव गेलेला, मेलेला
वि+तृ (१ प प.)—देणें, हवाली करणें
विद्विष् (पु)—शत्रु
विधौत (वि)—स्वच्छ, धुतलेला
विपत्ति (स्त्री)—सकट, मृत्यु
विपरीतता—उलट स्थिति
विपर्यय —बदल
विप्रतिपन्न (वि+प्रति+पद्–क भू धा वि)—गोंधळलेला, परस्परविरुद्ध
विभव —ऐश्वर्य सपत्ति, भरभराट
वि+भ्राज् (१ आ प)—चकाकणें, शोभणें
विमार्गणम्—शोध
वि+मृश् (६ प प)—विचार करणें, वाटणें
विवरम्—भोक, खड्डा
विवर्ण (वि)—फिक्ट रगाचा
वि+रञ्ज् (१ उ प)—कटाळणें, त्रासणें
विलोपित (वि+लुप्–प्र–क. भू धा वि)—नाश केलेली.
विरिञ्च —ब्रह्मदेव
विल्म्वनम्—विल्व, खोबळा
विश्वकर्मन् (पु)—देवाचा कारागीर
विशांपति (पु)—राजा
विषण्ण (वि+सद्–क भू धा वि)—खिन्न
विसज्ञ (वि)—बेशुद्ध
विसृत (वि+सृप्–क. भू धा वि)—पसरलेला
विहाय (वि+हा–ल्यबन्त अव्यय)—टाकून, सोडून
वीचि (पु स्त्री)—लाट
वीर्यम्—पराक्रम, शौर्य
वीरुध् (स्त्री)—वेल
वृकोदर —भीम
वृत (वृ क भू धा वि)—निवडलेला, वेढलेला
वृत्ति (स्त्री)—उपजीविका
वृत्र —राक्षसाचे नाव
वृषध्वज —शकर
वेतनम्—मजुरी
वैश्वानर —अग्नि
वोढुम् (वह्–तुमन्त अव्यय)—धारण करण्याकरिता, उचलण्याकरिता
व्यपनीत (वि+अप+नी–क भू धा वि)—नाहीसा करेला, दूर नेलेला
व्यसनम्—पाप, दु ख

व्यसनम्—संकट

व्याहृत (वि + आ + हृ—क्त भू. धा. वि.)—बोललेला

व्योमन् (न.)—आकाश

## श

शंसित (शंस्—क्त. भू. धा. वि.)—शंसिलेला, स्तुति केलेला

शङ्कित (शङ्क्—क्त. भू. धा. वि.)—भ्यालेला

शक्र —इन्द्र

शठ —लबाड, धूर्त मनुष्य

शतशः (अव्यय)—शंभर वेळा

शतक्रतु (पु.)—इन्द्र

शरणम्—रक्षण, आसरा

शरण्य (वि.)—रक्षण करण्यास योग्य, आश्रयास योग्य

शरद् (स्त्री.)—शरदृतु, पावसाळा

शशाङ्क —चन्द्र

शाखिन् (पु.)—वृक्ष

शाठ्यम्—लबाडी, ठकबाजी

शार्दूल —वाघ

शालिवनम्—शाली धान्याचें शेत

शिवारुतम्—कोल्हेकुई

शिखिन् (पु.)—मोर, अग्नि

शिबि (पु.)—राजाचें नांव

शुभ्र (वि.)—शुभ्र

श्येन —ससाणा

श्रीमत् (वि.)—श्री-ऐश्वर्ययुक्त, मंगलयुक्त

श्रेष्ठिन् (पुं.)—व्यापारी, वाणी

## ष

षट्चरण —भुंगा

षण्ड —ण्डम्—समूह, समुदाय

## स

संवृत (सम्+वृ—क्त भू. धा. वि.)—आच्छादिलेला, झाकलेला

संलीन (सम्+ली—क्त भू. धा. वि.)—एकरूप झालेला

सम्+हु (३ प. प.)—अर्पण करणें, आहुति देणे

संशप्तक —मागें न परतणारा योद्धा

सदृश (वि.)—सारखा

संयुगम्—युद्ध

संग्राम —युद्ध

सत्तम (वि.)—अत्युत्तम

सत्त्वम्—सामर्थ्य

सत्यवाच् (वि.)—खरें बोलणारा

सत्यसन्ध (वि.)—वचन पाळणारा

सव्यसाचिन् (पु.)—अर्जुनाचें नाव

सद् (१ प. प.)—खचून जाणें, धीर खचणें

सदस् (न.)—सभा

सन्त्रस्त (सम्+त्रस्—क्त भू. धा. वि.)—भ्यालेला

सन्दीपित (सम्+दीप्—क्त. भू. धा. वि.)—पेटविलेला

सम्+धा (३ उ. प.)—जोडणें

सन्धानम्—जोडणें
सन्धि (पु)—तह
संनिकृष्ट (सम्+नि+कृष्—क भू धा. वि)—अवघ्र असलेला
सन्निपात—एकत्र होणें, समुदाय
सन्निभ (वि)—सदृश
सन्निहित (सम्+नि+धा—क भू धा वि)—जवळ ठेवलेला
सपत्न—शत्रु
सप्तच्छद—एक प्रकारचा वृक्ष
सभ्य (वि)—सभेंत बसलेला, (पु)—न्यायातील सदस्यास
सम (वि)—सारखा, न्यायी
समभेव (अव्यय)—एकदमच
समरम्—युद्ध
समस्या—श्लोकाचा चरण (श्लोक पुरा करण्याकरिता दिलेला)
समा (स्त्री बहुवचन)—वर्षें
समा+धा (३ उ प)—जोडणें, समाधान करणें, एकाग्र करणें
समा+वृ (५ उ प)—झाकणें, आच्छादणें
समा+श्रि (२ प प)—धार धरणें
समाहित (सम्+आ+धा—क भू धा वि)—एकत्र केलेलें प्रशान्त
समुत्थित (सम्+उद्+स्था—क भू धा वि)—उत्पन्न झालेला वर चढलेला
समुद्गीर्ण (सम्+उद+गॄ—क भू धा वि)—बाहेर टाकलेला
समुद्+गॄ (६ प. प)—बाहेर टाकणे
सम्बोध्य (सम्+बुध्—प्र—ल्यबन्त अव्यय)—उपदेश करून
सम्भार—तयारी
सम्भ्रान्त (सम्+भ्रम्—क भू धा वि)—गोंधळलेला घाबरलेला
सम्+मन्त्र् (१० आ. प)—एकत्र विचार करणें
सद्भाव—एकचित्तता
सरित् (स्त्री)—नदी
सलिलम्—पाणी
सस्यम्—धान्य
सहिम (वि)—थंडीनें युक्त
साक्षात् (अव्यय)—प्रत्यक्ष
साक्षिन् (पु)—पाहाणारा, साक्ष देणारा
सादनम्—घर
साध् (५ प प)—साध्य करणें, मिळविणें
साम्प्रतम् (अव्यय)—हल्लीं, (वि)—योग्य
सार रम्—तत्त्व, सामर्थ्य
सारस—बगळा
सास्रम् (अव्यय)—अश्रु डोळ्यात आणून
सीमन् (स्त्री)—सीमा, मर्यादा
सुजन—चांगला मनुष्य
सुधामुच् (वि)—अमृत स्रवणारा
सूकर—डुक्कर
सेवित (सेव्—क भू धा वि)—आचरलेला, व्यापलेला
सोम—चन्द्र, सोमरस

# भाग तिसरा—मराठी पाठ

( संस्कृत भाषान्तराकरितां )

---

## १—संस्कृत भाषान्तराकरितां सूचना

पहिल्या पुस्तकामध्यें साध्या वाक्यातील शब्दाची रचना कशी असली पाहिजे हें सोदाहरण दर्शविलेलें आहे त्याचप्रमाणें दोन साधीं वाक्यें च–वा या उभयान्वयी अव्ययानीं कशीं जोडतां येतात हेंहि दाखविलेलें आहे आतां संयुक्त व संमिश्र वाक्याची रचना कशी करतात हें पाहूं.

१ मी घरीं गेलों कारण मला बरें नव्हतें—अहं गृहम् अगच्छम् यतः अहम् अस्वस्थः आसम् । किंवा अहं गृहम् अगच्छम् । अहं हि अस्वस्थः आसम् । किंवा अहम् अस्वस्थः आसम् । अतः अहं गृहम् अगच्छम् ।

राम हुषार आहे परंतु तो अभ्यास करीत नाहीं—रामः चतुरः वर्तते किन्तु–परं–परन्तु सः अध्ययनं न करोति । किंवा रामः चतुरः अस्ति । स तु अध्ययनं न करोति ।

वरील वाक्याच्या भाषान्तरावरून 'यत –हि–अत ' व 'किन्तु–पर–परन्तु–तु' या उभयान्वयी अव्ययांचा संयुक्त वाक्यें जोडण्याकरितां उपयोग होतो हें दिसून येईल.

२ रामा तूं १४ वर्षें वनात राहा असें दशरथ रामाला म्हणाला—हे राम त्वं चतुर्दश वर्षाणि वने वस इति दशरथः रामाय अकथयत् ।

मुलानीं आईबापाची आज्ञा पाळावी हें योग्य आहे—बालाः पितरौ अनुरुध्येरन् इति युक्तं भवति । किंवा एतद् युक्तं यद् बालाः पितरौ अनुरुध्येरन् ।

एकमेकांबरोबर भांडू नका असा उपदेश करून म्हाताऱ्यानें प्राण सोडला—**परस्परेण सह मा विवदध्वम् इति उपदिश्य वृद्धः प्राणान् अत्यजत् ।**

आतां आपण बागेंत जावें असा विचार करून तो मनुष्य निघाला—**अधुना उद्यानं गच्छेयम् इति विचार्य सः नरः प्रस्थितः ।**

वरील वाक्यांतील मनांत आणलेल्या विचारदर्शक वाक्यानंतर अथवा तोंडानें उच्चारलेल्या वाक्यानंतर 'इति' हें अव्यय योजलेलें आहे. याच अर्थी उच्चारलेल्या वाक्याच्या आरंभीं 'यत्' हेंहि योजतात.

३ ज्या मित्राबरोबर मी पुष्कळ दिवस राहिलों तो हा—**येन सह अहं चिरं न्यवसम् तद् एव इदं मित्रम्—सः एव अयं वयस्यः ।**

ज्याच्या मदतीनें अर्जुनाला जय मिळाला तो कृष्ण यादवांचा प्रमुख होता—**यस्य साहाय्येन अर्जुनः जयम् अलभत सः कृष्णः यादवानां प्रमुखः ।**

ज्या देवीच्या प्रसादानें कवि काव्यें करतात त्या सरस्वतीला नमस्कार असो—**यस्याः कृपया कवयः काव्यानि रचयन्ति तस्यै सरस्वत्यै नमः ।**

वरील संमिश्र वाक्यांतील गौण वाक्यांत 'यद्' या संबंधी सर्वनामाचें आवश्यक विभक्तींतें रूप योजलेलें आहे व मुख्य वाक्यांत त्याचा पूर्वगामी शब्द जरूर त्या विभक्तींत योजलेला आहे. संबंधी सर्वनाम व पूर्वगामी शब्द यामध्यें 'लिंग व वचन' यामध्यें ऐक्य असलेंच पाहिजे, विभक्तींत असेल अथवा नसेल.

४ जेव्हां मी घरी गेलों तेव्हां मित्राला भेटलों—**यदा अहं गृहम् अगच्छम् तदा अहं मित्रम् अपश्यम् ।**

जोंपर्यंत देहांत सामर्थ्य आहे तोंपर्यंत मनुष्यानें पैसा मिळवावा—**यावत् शरीरे शक्तिः विद्यते तावत् एव नरः धनं विन्देत ।**

जर तुम्ही माझें म्हणणें ऐकाल तर तुमचें कल्याण होईल—**यदि यूयं मम वचनं शृणुयात तर्हि युष्माकं कल्याणं भवेत् ।**

जरी त्यानें पुष्कळ श्रम केले तरी त्याला यश मिळालें नाहीं—

**यद्यपि सः बहु अध्ययनम् अकरोत् तथापि तेन यशः न प्राप्तम् ।**

ज्या रीतीनें तुम्ही माझ्याशीं वागाल तसे मी तुमचें रक्षण करीन—**यथा यूयं मयि व्यवहरेत तथा अहं युष्माकं रक्षणं कुर्याम् ।**

वरील मिश्र वाक्यांतील गौण वाक्यांत 'यदा, यावत्, यदि, यद्यपि व यथा' या संबंधी क्रियाविशेषण अव्ययाचा उपयोग केलेला आहे व मुख्य वाक्यांत त्याच्याच जोडीच्या 'तदा, तावत्, तर्हि, तथापि व तथा' या अव्ययाचा उपयोग केलेला आहे.

५ तो मनुष्य या वेळीं घरीं गेला असेल—**अनेन समयेन सः नरः गृहं गतः भवेत्-भविष्यति ।**

आतां त्यानें घरीं गेलेंच पाहिजे—**अधुना तेन गृहं गन्तव्यम् एव ।**

तो मनुष्य बहिरा असावा-असलाच पाहिजे—**तेन नरेण बधिरेण भवितव्यम्-भाव्यम् ।**

त्याला गातां येतें—**सः गातुं शक्नोति-समर्थः ।**

तो रक्षण करण्याला योग्य आहे—**सः रक्षणाय अलम्-योग्यः ।**

अर्जुनाला कृष्णाच्या मदतीनेंच जयद्रथाला मारतां आलें—**कृष्णस्य साहाय्येन एव अर्जुनः जयद्रथं हन्तुं शक्तः अभवत् ।**

तो कधींहि खोटें बोलणार नाहीं—**सः न कदापि असत्यं वदेत्-ब्रूयात् ।**

तो मुलगा जाण्याच्या बेतांत होता—**सः बालः गन्तुम् उद्यतः-गन्तुमनाः-गन्तुकामः-गमनोत्सुकः वा आसीत् ।**

वरील मराठी वाक्यामध्यें निरनिराळ्या काळांतील निरनिराळ्या तऱ्हेचीं विधेयें आलेलीं आहेत. त्याचें भाषान्तर वर दर्शविलेल्या पद्धतीप्रमाणें केलें पाहिजे.

६ (अ) राजाला नमस्कार करून व शत्रूकडील बातमी सांगून हेर स्तब्ध राहिला—**राजानं प्रणम्य शत्रुवार्तां च तस्मै निवेद्य चारः तूष्णीं स्थितः ।**

सर्व लंकेभर सीतेचा शोध करून थकून जाऊन मारुति चित्रकूट

पर्वतावर विश्रान्ति घेता झाला—**अखिलायां लङ्कायां सीताम् अन्विष्य श्रान्तः च भूत्वा मारुतिः चित्रकूटे व्यश्राम्यत्।**

(आ) वडिलांना न सांगता मुलगा खेळावयास गेला—**जनकाय अकथयित्वा बालः क्रीडितुं गतः।**

कोणालाहि न विचारता त्या मुलानें वाट शोधून काढली—**कमपि अपृष्ट्वा सः बालः मार्गम् अन्वैष्यत्।**

(इ) त्या मुलाला धडा वाचतांना मी पाहिलें—**पाठं पठन्तं तं बालम् अहम् अपश्यम्।**

तो मनुष्य फिरत फिरत मुंबईत आला—**इतस्ततः सञ्चरन् एव सः नरः मुम्बापुरीम् आगतः।**

सज्जनाचें स्वरूप यथार्थपणें न ओळखल्यामुळें दुष्ट त्यांचा छळ करतात—**सतां यथार्थं स्वरूपम् अजानन्तः खलाः तान् पीडयन्ति।**

'अ' मध्यें एकाच कर्तृपदाशीं जोडलेल्या शेवटच्या क्रियेशिवाय अन्य क्रियाबद्दल ल्यबन्त अव्ययें जोडलेली आहेत 'आ' मध्यें ल्यबन्त अव्ययाची नकारार्थी रूपें त्यांना पूर्वी 'अ' जोडून तयार केलेलीं योजलेली आहेत व 'इ' मध्यें वर्तमानकालवाचक धातुसाधिताचा कसा उपयोग करता येतो हें दाखविलें आहे.

७ (अ) वाटेंत रात्र झाल्यामुळें वाटसरू देवळांत राहिले—**मार्गे पथ सञ्जातायां रात्र्यां मार्गासिनः देवालये अवसन्।**

(आ) अशा रीतीनें विचार करता करता सर्व दिवस निघून गेला—**एवं विचारयतः नरस्य-एवं विचारयति नरे अखिलः दिनावधिः व्यतीतः।**

(इ) रखवालदार पाहात असतांना मुद्दां चोरांनीं राजवाड्यात प्रवेश केला—**पश्यतः अपि रक्षकस्य चौराः प्रासादं प्रविष्टाः।**

(ई) ते दोन हंस कासवाला आकाशांतून नेत असतांना लोकांनीं ओरड केली—**हंसाभ्याम् आकाशमार्गेण नीयमाने कूर्मे जनैः महान्कोलाहलः कृतः।**

(उ) हरिणाला धरण्याकरिता राम गेला असता रावणानें सीतेला पळविली—
**मृगग्रहणाय गते रामे रावणः सीताम् अपाहरत्।**

(ऊ) सोपल्या जळल्यामुळें शेतकरी निराधार झाले—**दग्धेषु उटजेषु कृषीवलाः अनाथाः अभवन्।**

वरील वाक्यामध्यें दोन दोन क्रिया आहेत व त्यांतील पहिली क्रिया दुसऱ्या क्रियेचा वेळ दर्शविते व त्या दोन्ही क्रियांची कर्तृपदें भिन्न आहेत. म्हणून गौण क्रियेबद्दल 'यदा-यावत्' या अव्ययांनीं युक्त वाक्यें न योजतां 'सति सप्तमी किंवा सत षष्ठी' योजून भाषान्तर केलें पाहिजे. विशेष माहिती सं. वाक्यरचना पाठ ३१ मध्यें पहा.

८ (अ) सुख व दुःख यांकडे लक्ष न देतां मनुष्यानें कर्तव्य करावें—**सुखदुःखे अगणयित्वा नरः कर्तव्यम् आचरेत्।**

देव, यक्ष व किन्नर यांनी श्रीरामावर पुष्पवृष्टि केली—**देवयक्षकिन्नराः श्रीरामे पुष्पवृष्टिम् अकुर्वन्।**

(आ) मरणाच्या भीतीनें मनुष्यानें रणाङ्गणांतून पळून जाऊं नये—**मृत्युभयेन नरः रणाङ्गणात् न पलायेत।**

अर्जुनासारखा योद्धा विरळा—**अर्जुनसमः योधः विरलः।**

पिंजऱ्यांत अडकविलेल्या पोपटाला स्वातन्त्र्य प्रिय असतें—**पञ्जरनिबद्धस्य शुकस्य स्वातन्त्र्यं प्रियं भवति।**

विश्वामित्राच्या तपश्चर्येची इन्द्राला भीति वाटली—**इन्द्रः विश्वामित्रतपसः भीतः।**

(इ) बर्फाप्रमाणें शुभ्र बगळे आकाशांत उडतात—**हिमशुभ्राः बलाकाः आकाशे डयन्ते।**

अमृताप्रमाणें मधुर बोलणें सर्वांना आवडतें—**अमृतस्वादु वचनं सर्वेभ्यः रोचते।**

विष्णूच्या चरणरूपी कमलांची भक्त पूजा करितात—**विष्णोः चरणकमले भक्ताः पूजयन्ति।**

थंड वारा, स्वच्छ पाणी व मधुर फळें यांनीं प्रवाशाचा श्रमपरिहार

होतो—शीतपवनः निर्मलजलं मधुरफलानि च पथिकश्रमं परिहरन्ति ।

(ई) रावणाला मारून अयोध्येला आलेल्या रामाचें प्रजेनें स्वागत केलें—
**अयोध्यां निवृत्तं हतरावणं रामं किंवा रावणं हत्वा अयोध्यां निवृत्तं रामं प्रजाः अभ्यनन्दन् ।**

पुत्राच्या वधाची वार्ता ऐकून श्रावणाच्या मातापित्यांनी शोक केला—
**श्रुतपुत्रवधवार्तौ-पुत्रवधवार्तां श्रुत्वा श्रावणस्य पितरौ व्यलपताम् ।**

मुलाला बरोबर घेऊन बाप बगेंत गेला—**सपुत्रः जनकः** किंवा **पुत्रेण सह जनकः उद्यानं गतः ।**

रस सुकलेलें फळ कोणी खात नाहीं—**शुष्करसं फलं न कोऽपि भक्षयति ।**

तपश्चर्यारूपी धन ज्यांच्याजवळ आहे त्यांना विषयापासून त्रास होत नाहीं—**तपोधनान् नरान् विषयाः न पीडयन्ति ।**

(उ) रामाजवळ मारुति उभा राहिला—**मारुतिः उपरामम् स्थितः ।**
शास्त्रानुसार ईश्वराची पूजा करावी—**यथाशास्त्रं नरः देवं पूजयेत् ।**
दर दिवशीं मनुष्यानें स्नान करावें—**प्रतिदिनं नरः स्नायात् ।**

वरील अ मध्यें द्वन्द्व समास, आ मध्यें तत्पुरुष समास, इ मध्यें कर्मधारय समास, ई मध्यें बहुव्रीहि समास व उ मध्यें अव्ययीभाव समास योजलेले आहेत. संस्कृत भाषान्तरामध्यें योग्य ठिकाणीं समास कसे योजावे हें वरील उदाहरणावरून समजून येईल. ज्यास्त माहितीकरितां [illegible] वाक्यरचना पाठ ३२ ते ३४ व रा. भाषाप्रदीप पु. २ पाठ ११ पहा—

९ (१) तो मनुष्य श्रीमान् आहे एवढेंच नव्हे तर तो बुद्धिमानहि आहे—
**न केवलं सः नरः धनिकः वर्तते अपि [illegible] बुद्धिमान् अस्ति ।**

(२) दरिद्री मनुष्याची संगत पुरवली परंतु दुष्टाची नको—**वरं दरिद्रेण नरेण सङ्गतिः न पुनः खलेन ।**

(३) शिवाजीचा एकेक योद्धा शत्रूचा पराभव करी, तर मग सर्वजण मिळून किती ज्यास्त करीत असतील बरें !—**शिवनृपस्य एकः अपि योधः शत्रुं पराजयत किमुत–किं पुनः–किमङ्ग–किमु–योधसमूहः ।**

(४) आपण विद्वान् आहां हें कबूल परंतु तरीसुद्धां आपल्याला विनयानें वागलें पाहिजे—**कामं भवान् विद्यावान् तथापि भवता विनयेन एव व्यवहर्तव्यम् ।**

(५) वारा इतका जोरानें वाहात होता कीं पुष्कळ झाडें उपटलीं गेलीं—**वायुः तथा वेगेन अवहत् यथा बहवः वृक्षाः उन्मूलिताः ।**

वरील पांच वाक्यामध्यें 'न केवल–अपि तु, वरं–न, किमु–किमुत–किं पुनः–किमङ्ग, कामम्–तथापि, तथा–यथा' या अव्ययांचा त्या त्या वाक्यांत अर्थानुरूप उपयोग केलेला आहे. वरील वाक्यांमारख्या रचनेच्या वाक्यांचें भाषान्तर करतांना योग्य त्या अव्ययांचा उपयोग करावा लागतो.

संस्कृत भाषान्तराला उपयुक्त अशा सामान्य सूचना वर दिलेल्या आहेत. निरनिराळ्या कारकांचा, काळांचा व धातुसाधितांचा संस्कृत भाषान्तरामध्यें कसा उपयोग करतां येईल हें सं. वाक्यरचना या पुस्तकांत त्या त्या विवक्षित पाठांत दाखविलेलें आहे.

# २—मराठी वाक्यसमूह व उतारे

१

१ रामानें रावणाला मारिलें **कारण** त्यानें सीतेचा अपहार केला. २ सुग्रीवानें वानरांना सीतेच्या शोधार्थ पाठविलें **कारण** त्यानें रामाजवळ तसा ठराव केला होता. ३ सर्व शिपाई रणांगणांतून मागें परतले **कारण** सेनापति कोठेंहि दिसेना. ४ रामानें सीतेचा त्याग केला **परंतु** प्रजेला हें आवडलें नाहीं. ५ माझा मित्र मला वाटेंत भेटला **परन्तु** तो मजजवळ ही बातमी बोलला नाहीं. ६ कैकेयीनें रामाला वनांत पाठविलें **परंतु** भरताला हें आवडलें नाहीं. ७ मनुष्यानें कोणताहि धंदा करावा **परंतु** सचोटी सोडूं नये. ८ वाटसरु वडाच्या सावलींत बसले **कारण** लांब प्रवासानें ते थकले होते.

२

१ प्रसूतिकालापर्यंत शकुन्तला मजकडे राहूं दे **असें** पुरोहितानें दुष्यन्ताला सांगितलें. २ मनुष्यानें संकटाचे वेळीं आपल्या बान्धवांस साहाय्य करावें **हा** मनुष्यधर्म आहे. ३ उद्यां सकाळीं माझी तुरुंगांतून सुटका होईल **असें** कैद्याला वाटलें. ४ पुढच्या क्षणीं काय घडेल **हें** कोणालाहि सांगतां येत नाहीं. ५ दुर्जनांनीं सज्जनांचा द्रोह करावा **हा** त्याचा स्वभावच आहे. ६ आपण बागेंत हवा खाण्याकरितां जाऊं या **असें** मुलें बापाला म्हणालीं. ७ आजपासून वेळेवर शाळेंत ये **असें** गुरुजी म्हणाले. ८ उच्च शिक्षणाकरितां इंग्लंडला जावें **असें** हल्लीं पुष्कळ लोकांना वाटतें.

३

१ ज्या लोकांनीं शत्रूचा पराभव केला **त्यांना** राजानें बक्षिसें दिलीं. २ ज्या नरसिंहानें हिरण्यकशिपूचा वध केला **त्याला** नमस्कार असो. ३ ज्या

## ६

१ हात पाय धुऊन व ईश्वराला नमस्कार करून मनुष्यानें जेवावें. २ राजवाड्यांतून निघून व अरण्यांत जाऊन ध्रुवानें ईश्वराचें ध्यान केलें. ३ मुलावर न रागावतां बापानें त्याला क्षमा केली. ४ वाटेंत न थांबतां यात्रेकरू द्वारकेला गेले. ५ रात्रीं घरांत शिरतांना शिपायानें चोराला पकडलें. ६ झाडांना पाणी घालतांना दुष्यन्तानें शकुन्तलेला पाहिलें. ७ गोष्ट ऐकतां ऐकतां मुलें झोपीं गेलीं. ८ वानरांच्या मदतीनें रामानें लंका जिंकली, रावणाला मारलें, बिभीषणाला राज्यावर बसविलें व पुष्पक विमानांत बसून अयोध्येस परतला.

## ७

१ जीवित क्षणभंगुर असल्यामुळें मनुष्यानें पुण्य मिळवावें. २ सूर्य अस्ताचलावर उतरला तेव्हां सर्व लोक घरीं परतले. ३ सूर्य प्रकाशत असतांना दिवा निरुपयोगी असतो. ४ वृक्ष तोडला असतां वेलींनीं कोणाचा आश्रय करावा? ५ युद्ध चालू असतां सर्व लोक चिन्तातुर असतात. ६ हत्ती विकल्यानंतर अंकुशाबद्दल वाद कशाला? ७ सेनापति दिसेनासा झाल्याबरोबर शिपाई सैरावैरा धावूं लागले. ८ परीक्षा संपल्या-वर मुलें खेळूं लागलीं.

## ८

१ जयापजयाची पर्वा न करतां अर्जुनानें युद्ध केलें. २ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्तव्यें मनुस्मृतींत वर्णन केलेलीं आहेत. ३ झाडावर पिकलेलीं फळें मधासारखीं गोड लागतात. ४ मनुष्यरूपी पशु गवत खात नाहीं हें पशूचें भाग्य होय. ५ कारागृहांत टाकलेल्या चोरानें आपली सुटका करवली. ६ हातांत तलवार घेतलेल्या वीरानें शत्रूचें शीर उडविलें. ७ कमळासारखे डोळे असलेल्या मुलाला पाहून सर्वांस आनंद झाला. ८ काळ्या मेघांमुळें आकाश भयंकर रूप धारण करतें. ९ ईश्वराची

त्याला मदत आहे तो कोणालाहि भीत नाही. १० रस्त्याजवळ एक विष्णूचें सुंदर देऊळ होतें. ११ दररोज सकाळीं मुलांनीं क्रमानुसार वडील माणसास नमस्कार करावा.

## ९

१ मनुष्यानें दुसऱ्यास व्यर्थ त्रास देऊं नये इतकेंच नव्हे तर त्याला मदतहि करावी. २ एक सद्गुणी मुलगा पुष्कळ निर्गुणी मुलांहून बरा. ३ रामाच्या धनुष्याच्या टंकारानें सुद्धा त्रिखें नाहींशीं होत असत, मग बाणाच्या वर्षावानें किती त्यास्त होत असतील बरें! ४ आपण शूर आहा हें कबूल, परंतु युक्तीशिवाय शत्रूचा पराभव होणार नाहीं. ५ आळसात दिवस घालविण्यापेक्षां उद्योग करणें बरें. ६ अर्जुनानें एकसारखे असे बाण सोडले कीं शत्रूचें सैन्य त्यानीं झाकून गेलें. ७ एका मनुष्यानेंहि हें काम होणें शक्य आहे, मग दहा असल्यावर काय विचारावें! ८ परमेश्वर भक्ताला मदत करतो एवढेंच नव्हे तर त्याच्यासाठीं कष्टहि सोसतो.

## १०

एका गावात धीरवृत्ति नावाचा एक मुलगा राहात होता. तो दररोज सकाळीं गावाच्या बाहेर फिरावयास जाई. गावाच्या जवळूनच एक नदी वाहात होती. त्या नदीवर एक मोठा पूल बांधलेला होता. एकदा धीरवृत्ति नेहमींप्रमाणें त्या पुलावरून जात असता त्यानें 'वाचवा, वाचवा' असे दीनवाणे शब्द ऐकिले. ज्या ठिकाणाहून ते शब्द निघाले होते तिकडे त्यानें नजर फेंकली. तेव्हां त्याला एक स्त्री पाण्यात बुडत असलेली दिसली. धीरवृत्ति नावाप्रमाणे फार धीट होता व त्याला पोहता येत होतें. त्यानें कपडे काढून एकदम नदींत उडी घेतली व त्या बाईला एका हाताने धरून तो नदीच्या काठावर सुरक्षित पोंचला. तेव्हां ती स्त्री त्याला म्हणाली 'बाळा, मी तुझी फार आभारी आहें. ईश्वर तुझें कल्याण करो. मी कपडे धुण्याकरिता नदीवर आलें असताना दगडावरून पाय घसरला व नदींत पडलें.' मुलानें उत्तर दिलें 'यात मीं माझें कर्तव्यच केलें.' इतकें बोलून तो मुलगा आपल्या वाटेनें निघून गेला.

## ११

प्राचीन काळीं अन्ड्रोक्लिज नावाचा एक नोकर आपल्या धन्याच्या घरांतून पळाला, कारण त्याचा धनी त्याला फार क्रूरतेनें वागवी. रानात बराच वेळ तो हिंडला व थकल्यामुळें एका रिकाम्या गुहेमध्यें झोंपला. कांहीं वेळानें त्यानें एका सिंहाची गर्जना ऐकली. त्याला आपला मृत्युच जवळ आला असें वाटलें म्हणून तो फार भ्याला. इतक्यात तो सिंह हु ळानें ओरडत हळु हळु येताना दिसला. तो त्याच्याजवळ आला व आपला उजवा पाय वर धरून उभा राहिला. अन्ड्रोक्लिजानें त्या पायात एक काटा पाहिला, म्हणून त्यानें तो ओढून काढला. तेव्हा तो सिंह आनंदानें नाचू लागला. तो सिंह अन्ड्रोक्लिजाचा मित्र बनला. पुढें अन्ड्रोक्लिजाला शोधणाऱ्या शिपायानीं त्याला पकडलें व त्याला सिंहाच्या पिंज-ऱ्यात सोडण्यात आलें. परंतु सिंहानें त्याच्यावर झडप घातली नाहीं व तो त्याच्याजवळ स्वस्थ उभा राहिला. अन्ड्रोक्लिजानेंहि त्या सिंहाला ओळखलें. हा चमत्कार पाहून अन्ड्रोक्लिजाला मोकळें करण्यात आलें व नतर तो सिंहाला घेऊन दूर निघून गेला.

## १२

धारा नगरींत सिन्धुल नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला म्हातारपणीं भोज नावाचा मुलगा झाला. जेव्हां तो पाच वर्षांचा झाला तेव्हा त्या वृद्ध राजानें आपलें राज्य मुंज नावाच्या आपल्या भावाला दिलें व त्याला मुलाचें रक्षण करण्यास सांगितलें. पुढें राजा मारल्यावर मुंजानें मुख्य प्रधानाला दूर करून दुसऱ्यास त्याच्या जागीं नेमलें. पुढें एक ब्राह्मण राजसभेंत येऊन म्हणाला कीं मी ज्योतिःशास्त्रपारंगत आहें तेव्हा राजानें त्याची परीक्षा करण्याकरिता त्याला आपलें पूर्वचरित्र वर्णन करण्यास सांगितलें. त्या ब्राह्मणानें सर्व गोष्टी बरोबर सांगितल्या. राजा संतुष्ट झाला व त्यानें राजपुत्र भोज याचें भाग्य वर्णन करण्यास त्यास सांगितलें. तेव्हा ब्राह्मण म्हणाला कीं भोज हा लवकरच राजा होईल व पुष्कळ वर्षें राज्य करील. हें ऐकून मुंजाला विषाद वाटला व त्यानें भोजाला मारण्याचा प्रयत्न केला. परंतु मोठ्या प्रयत्नानें तो वाचला. पुढें मुंजाला पश्चात्ताप झाला व त्यानें भोजाला राज्यावर बसविलें व आपण तपश्चर्येकरिता अरण्यात निघून गेला.

## १३

पूर्वी सुकेतु नावाचा प्रसिद्ध महायक्ष होता. त्याचें आचरण शुद्ध होतें. त्याला मूल नव्हतें म्हणून त्यानें मोठें तप केलें. तपश्चर्येनें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्याला ताटका नावाची मुलगी दिली. तिला हजार नागांचें बळ होतें. तारुण्यावस्थेंत प्रवेश केल्यावर त्यानें तिचा विवाह जम्भपुत्र सुन्द याच्याशीं लावला. तिला पुढें मारीच नावाचा मुलगा झाला. सुन्द मेल्यानंतर ताटका आपल्या मुलासह अगस्ति ऋषींना खाण्याकरितां त्यांच्यावर चाल करून गेली. तेव्हां अगस्त्य ऋषींनीं मारीचाला राक्षस हो असा शाप दिला. त्याचप्रमाणें ताटकेलाहि तूं मनुष्य खाणारी व बेढब स्वरूपाची स्त्री हो असा शाप दिला. तेव्हां ताटका राक्षसी होऊन अगस्त्याच्या आश्रमाला फार त्रास देऊं लागली. म्हणून विश्वामित्राच्या सूचनेप्रमाणें रामानें ताटकेला मारली.

## १४

एके दिवशीं नरेंद्र आपल्या सोबत्यासह ध्यान करण्याचा खेळ खेळत होता. थोड्याच वेळांत तो डोळे मिटून व श्वास कोंडून ईश्वराचें ध्यान करूं लागला. इतक्यांत एक नाग फुत्कार करीत त्याचेजवळ आला. त्यामुळें तीं मुलें भ्यालीं. त्यांनीं आपापल्या जागा सोडून 'साप, साप' म्हणत पळ काढला. परंतु नरेंद्र मात्र आपल्या जागेवरून हालला नाहीं. घरांतील मडळींस ही हकीकत समजली. तेव्हां सर्व माणसें धावत तेथें आलीं. पाहतात तों नरेंद्राचे मस्तकावर फडा काढून उभा असलेला साप दिसला. नरेंद्र डोळे मिटून तसाच बसला होता. नरेंद्राचें मूळ नाव शंकर असें होतें व तो या वेळीं खरोखरच शंकरासारखा शोभत होता. साप मोठा होता म्हणून त्याचे जवळ जाण्यास कोणीहि धजला नाहीं. थोड्याच वेळांत नरेंद्राचें ध्यान संपलें व तो साप तेथून निघून गेला. अशा रीतीनें नरेंद्राचा प्राण बचावला. तेव्हां हा मुलगा सामान्य मुलगा नसून ईश्वराचा आवडता आहे असें सर्व लोकांस वाटलें. हाच नरेंद्र पुढें विवेकानन्द या नावानें प्रसिद्धीस आला.

## १५

कृष्णाची भार्या रुक्मिणी हिनें शंकराच्या प्रसादानें प्रद्युम्नाला जन्म दिला. शम्बर नावाच्या राक्षसाला समजलें कीं हा प्रद्युम्न आपल्याला ठार मारणार. म्हणून त्यानें जन्मानंतर सातव्या दिवशींच त्याला पळविलें. परंतु त्याचा आल्हाद-दायक चेहरा पाहून त्यानें त्याला मारलें नाहीं, व काय होईल तें होवो या विचारानें त्यानं त्याला समुद्रांत टाकलें. समुद्रांतील एका मोठ्या माशानें त्याला गिळलें दुसऱ्या दिवशीं कोळ्यांनीं मासे पकडले त्यांत तो माशाहि होता त्या कोळ्यांनीं तो मोठा मासा शम्बराला नजर केला. जेव्हां त्या माशाचें पोट फाडलें तेव्हां त्याच्या पोटांतून सूर्यासारखा तेजस्वी मुलगा बाहेर आला. तेव्हां शम्बरानें त्याला आपल्या स्त्रीच्या स्वाधीन केलें व मुलाप्रमाणें त्याचें पोषण करावयास सांगितलें पुढें मोठा झाल्यावर प्रद्युम्नानें शम्बराला द्वन्द्वयुद्धाला बोलाविलें व त्याच्याशीं बराच वेळ लढून त्याचें शिर उडविलें. नंतर तो आपल्या आईबापाकडे परत गेला.

## १६

गोकुळाजवळ यमुनेच्या डोहांत कालिया नावाचा एक महाविषारी सर्प होता. त्याच्या विषारी श्वासाच्या स्पर्शानेंच प्राणी मरत! तेव्हां कांहीतरी कारणानें कालियाचा नाश व्हावा म्हणून श्रीकृष्णानें एक युक्ति योजली. आपल्या सवंगड्यांना घेऊन डोहाजवळच तो चेंडूनें खेळू लागला. एकानें तो चेंडू इतक्या जोरानें फेंकला कीं तो डोहांत पडला तेव्हां सर्वांचा विरस झाला श्रीकृष्णानें सांगितलें कीं घाबरू नका, डोहांतला चेंडू मी आणतो व नंतर आपण पुन्हा खेळू या. असें बोलून सर्व सवंगडी नको नको म्हणत असतांना कृष्णानें डोहांत बुडी मारली तेव्हां पाण्याच्या खळबळीनें कालियानें डोकें वर काढलें व कृष्णाला जोरानें वेढलें. ही बातमी नंद, यशोदा व इतर सर्व यादवांना कळली तेव्हां ते सर्व फार शोक करूं लागले श्रीकृष्णानें आपलें शरीर फुगविण्यास सुरुवात केली. तेव्हां तें सहन न होऊन कालियानें कृष्णाला मोकळें केलें. कृष्णानें चटकन त्याचे डोक्यावर उडी मारली व तो नाचूं लागला.

त्यामुळें कालिया मरणोन्मुख झाला व त्यानें कृष्णाची क्षमा मागितली. कृष्णानें त्याला जीवदान देऊन तें ठिकाण सोडून जाण्यास सांगितलें

१७

विवेकानन्दांनी वैदिक धर्माचें महत्त्व सर्व जगभर प्रस्थापित केलें व नंतर ते जन्मभूमीस परतले. त्याच वेळीं हिंदुस्थानांत फार मोठा दुष्काळ पडला. गरीबच नव्हे तर सधन लोक सुद्धा पटापट मरूं लागले. मनुष्य हा परमेश्वराचें स्वरूपच होय ही भावना ज्याच्या मनांत दृढ होती त्या विवेकानन्दांनी एक साहाय्यसभा स्थापिली. त्यांनीं लोकांजवळ पैसे मागितले व अशा रीतीनें सेवा करण्यास सुरवात केली. हें काम करीत असतांना त्यांची प्रकृति खालावली परंतु ते अहोरात्र श्रम करीत. ते म्हणत 'ईश्वर हा प्राणिमात्राचे ठिकाणीं भरला आहे. तेव्हां मला त्या परमेश्वराचीच सेवा करण्याची संधि मिळाली आहे ती मी कां गमावूं?' अशा रीतीनें त्यांनी पुष्कळ परोपकार केला व हजारों लोकांचे प्राण वांचविले. ते आपल्या शिष्यास असा उपदेश करीत कीं तुम्ही कोणत्याहि प्रकारची अपेक्षा न करतां परोपकार करीत राहा. हाच मोक्षाचा सुलभ मार्ग आहे

१८

भारतीय युद्ध संपल्यावर युधिष्ठिराला वाटलें कीं युद्धांत बान्धवांना मारून आपण फार पाप केलें. म्हणून पापाचें परिमार्जन करण्याकरितां व्यास व कृष्ण यांनीं त्यास अश्वमेध करण्यास सांगितलें. तेव्हां रिकामा खजिना द्रव्यानें पूर्ण करण्याकरितां पाण्डव धन आणण्यास निघाले. महादेवाच्या कृपेनें ते जेथें जाणीत तेथें त्यांना अगणित संपत्ति मिळे. अशा रीतीनें पुष्कळ संपत्ति जमवून पाण्डव परत फिरले. इकडे अभिमन्यूची बायको उत्तरा ही गरोदर होती. ती योग्य वेळीं प्रसूत झाली. परंतु जन्मलेला मुलगा उपजतच मेलेला होता. हें पाहून सुभद्रा, कुन्ती व इतर स्त्रिया शोक करूं लागल्या. तें पाहून श्रीकृष्णानें आपल्या अलौकिक सामर्थ्यानें त्या मृत मुलाला जिवंत केलें! हाच मुलगा पुढें

परीक्षित् म्हणून प्रसिद्ध झाला. पाण्डव द्रव्याच्या राशि घेऊन परत येतात तोंच त्याना परीक्षिताच्या जन्माची हकीकत समजली. तेव्हा त्यांचा आनंद पोटात मावेनासा झाला व त्यांनीं अश्वमेधाची जोरानें तयारी केली.

## १९

पाण्डव अज्ञातवासात असताना त्याना ओळखून काढण्याकरिता कौरवानीं हेर पाठविले होते. परंतु कोणालाहि त्याचा पत्ता लागेना. तेव्हा भीष्म, द्रोण व विदुर यांच्याशिवाय इतरांना ते मेले असावे असें वाटलें. विराटाचा शत्रु व कौरवाचा मित्र सुशर्मा यानें असा विचार केला कीं कीचक मारला गेला आहे, तेव्हा विराटाचें धन व गाई चोरून आणण्यास ही वेळ बरी आहे म्हणून त्यानें कौरवाचे साहाय्यानें विराटावर स्वारी केली. दोन्ही पक्षाचें मोठें युद्ध होऊन विराट राजा शत्रूचे हातीं सापडला, हें पाहून कृतघ्नतेचा दोष टाळण्याकरिता युधिष्ठिराच्या सूचनेवरून भीम पुढें झाला व त्यानें शत्रूचा पराभव करून विराटाची सुटका केली. इकडे असें चाललें असता दुर्योधनानें विराटाच्या गाई पळविल्या. तेव्हा राजपुत्र उत्तर शत्रूबरोबर लढण्यास निघाला. तेव्हा बृहन्नडेच्या वेषात असलेल्या अर्जुनानें त्याचा सारथी होऊन कौरवाचा पराभव केला.

## २०

मिराबाई ही मारवाडच्या राजाची मुलगी हिचें लग्न मेवाडच्या राजा कुम्भ याच्याशीं झालें ही विष्णूची एकनिष्ठ भक्त होती. तिच्या सासूला हें आवडत नसे म्हणून तिनें तिला राजवाड्यातून हाकून दिलें. ती निघाली तेव्हा तिच्या नवऱ्यानें तिला काहीं द्रव्य दिलें होतें. तिनें तें सर्व गोरगरिबाना देऊन टाकलें, आणि स्वत भिकारणीप्रमाणें राहू लागली. तिचें सौन्दर्य अप्रतिम होतें. तिचा आवाज मधुर होता त्यामुळें तिचें भजन ऐकून पुष्कळ लोक कृष्णाचें भजन करू लागले. अशा रीतीनें वृन्दावनापासून द्वारकेपर्यंत ती भजन करीत हिंडली. तिची ही अलौकिक भक्ति व सद्वर्तन पाहून तिचा पति राणा कुम्भ याचें मन पालटलें व त्यानें तिला परत घरीं आणविलें. तिचें मन प्रसन्न व्हावें म्हणून त्यानें

अन्त पुरात श्रीकृष्णाची मूर्ति स्थापन केली. एकदा बापाकडून आलेला विषाचा पेला ती प्याली. परंतु त्यामुळें ती न मरता कृष्णाची मूर्ति काळी पडली. हा चमत्कार पाहून तिच्या बापाला पश्चात्ताप झाला.

## २१

पूर्वी प्राग्ज्योतिष् नावाच्या देशावर नरक नावाचा क्रूर राजा राज्य करीत होता. त्यानें सर्व देवाना त्रास दिला. तेव्हा त्यानी नरकासुराची दुष्ट कृत्यें कृष्णास सांगितलीं. तेव्हा श्रीकृष्ण सत्यभामेसह प्राग्ज्योतिषास गेला. तेथील सर्व किल्ले फोडून श्रीकृष्णानें पाञ्चजन्य शंख वाजविला. त्या आवाजानें नरकासुराचा प्रधान मुर नावाचा राक्षस जागा झाला व त्रिशूल घेऊन कृष्णाबरोबर लढण्यास आला. तेव्हा कृष्णानें गदेनें त्रिशूल मोडून त्याला ठार केलें म्हणून कृष्णाला मुरारि किंवा मुरभिद् असें म्हणतात. नतर नरकासुराच्या इतर सेनापतींना त्यानें यमसदनास पाठविलें. तेव्हा स्वतः नरकासुर हत्तीवर बसून लढण्यास आला. गरुडानें नरकासुराच्या हत्तीचा व सैन्याचा पराभव केला. तेव्हा खवळलेल्या नरकासुरानें निरनिराळी आयुधें कृष्णावर फेकली, पण ती सर्व कृष्णानें मोडली व सुदर्शन चक्रानें नरकाचें शिर उडविलें नतर त्याच्या मुलास सिंहासनावर बसवून कारागृहात ठेवलेल्या १६००० स्त्रियांना कृष्णानें सोडविलें.

## २२

विदर्भ देशाच्या भीष्मक राजाची मुलगी रुक्मिणी ही फार सुंदर व सद्गुणी होती. यौवनावस्थेंत जेव्हा तिनें प्रवेश केला तेव्हा भीष्मकानें श्रीकृष्णाशी तिचा विवाह करण्याचें ठरविलें. परतु विष्णूचा द्वेष करणाऱ्या तिच्या भावाला तें आवडलें नाही. त्यानें चेदि देशचा राजा शिशुपाल याला तिला देण्याचें ठरविलें, कारण तो कृष्णद्वेष्टा होता. हें पाहून भयभीत झालेल्या रुक्मिणीनें श्रीकृष्णाला एक पत्र पाठविलें. तेव्हा श्रीकृष्ण सूर्योदयापूर्वी कुण्डिनपुरास आला. तो येतो त्यापूर्वीच सर्व शहर ध्वज, पताका व तोरणें यांनीं सुशोभित झालें होतें व चेदि देशाचा राजा शिशुपाल तेथें आलेला होता. भीष्मकानें श्रीकृष्णाला राहाण्याकरिता नगरा-

बाहेर एका बागेंत जागा दिली. थोड्याच वेळात रुक्मिणी व तिच्या मैत्रिणी तेथेंच अम्बिकेच्या दर्शनाला आल्या. देवीची पूजा करून रुक्मिणीनें इकडे तिकडे नजर फेकली. तेव्हा तिचा हेतु ओळखून श्रीकृष्णानें तिला एकदम पळविलीं.

## २३

विदर्भ देशात सत्यरथ नावाचा राजा राहात असे. त्याचे राज्य बळकविण्याकरितां साल्व देशाचा राजा दुर्धर्ष यानें कुण्डिनपुराला वेढा दिला. सात आठ दिवस लढल्यानंतर सत्यरथ मारला गेला. तेव्हा साल्व राजाचे शिपाई राजवाड्यात शिरले. राजवाड्यातील सर्व उत्तम अलंकार व रत्नें त्यांनी चोरून नेलीं. राणी शीलवती गरोदर होती. ती दाट काळोखात घरातून बाहेर पडली व रात्रभर अरण्यात फिरत राहिली. सकाळीं तहानेनें व्याकूळ होऊन ती एका स्वच्छ तळ्यातील पाणी प्याली. तितक्यातच ती प्रसूत झाली. तिनें मुलाला एका फरशीवर निजविलें व ती वस्त्र धुण्याकरिता तळ्यात उतरली. इतक्यात एका सुसरीनें तिचे पाय पकडले व तिला पाण्यात ओढलें. त्यामुळें ती मेली. तें मूल रडूं लागले, तेव्हा जवळच असलेल्या ऋषींच्या आश्रमातून एक तापसी आली व तिनें त्या मुलाला उचलून आश्रमात नेलें. अशा रीतीनें तें मूल वाचलें.

## २४

दुष्यन्त नांवाचा फार शूर राजा होऊन गेला. तो शिकारीसाठी अरण्यांत गेला होता. तो एका हरणावर बाण मारण्याच्या बेतात होता परंतु तें हरीण कण्व ऋषींच्या तपोवनांतील होतें. म्हणून कण्व ऋषींच्या शिष्यानें मोठ्यानें ओरडून विनंति केली की "हें आश्रमातील हरीण आहे, त्याला मारू नका, आपलें शस्त्र निरपराध्यांना मारण्याकरिता नाहीं तर पीडितांचें रक्षण करण्याकरिता आहे." हें बोलणें ऐकून दुष्यन्तानें बाण सोडला नाही तो रथातून खाली उतरला व ऋषींना भेटण्याकरितां आश्रमाकडे निघाला. त्या वेळी कण्व ऋषि माध्याह्न स्नानाकरितां मालिनी नदीवर गेले होते. म्हणून त्यांच्या मानलेल्या कन्येनें, शकुन्तलेनें, दुष्यन्ताचें स्वागत केलें. तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून राजाला आनंद

झाला. तेव्हा त्यानें तिच्या मैत्रिणींना तिचें जन्मवृत्त विचारिलें. तिचा जन्म क्षत्रियकुलांत झाला आहे हें ऐकून त्यानें तिच्याशीं गान्धर्व विधीनें विवाह केला.

## २५

सीतास्वयंवराचे वेळीं रामानें शंकराचें धनुष्य मोडलें. म्हणून परशुरामाला राग आला. विवाहविधि आटपून दशरथ राजा सर्वांसह अयोध्येस जात असतां वाटेंत त्याला जमदग्नीचा पुत्र परशुराम यानें अडविलें. त्यानें रामाला म्हटलें, 'रामा, तूं शंकराचें धनुष्य मोडून फार मोठी कीर्ति मिळविलीस व सर्वांनीं तुझी स्तुति केली. आतां तूं या दुसऱ्या विष्णुधनुष्याला बाण जोड, म्हणजे नंतर मी तुझ्याशीं द्वन्द्वयुद्ध करीन.' हें ऐकून दशरथ राजा शोकाकुल होऊन हात जोडून म्हणाला, 'हे परशुरामा, माझ्या मुलाला अभय दे.' परंतु परशुरामानें ऐकिलें नाहीं. तेव्हा रामानें वैष्णव धनुष्याला बाण जोडला व तो म्हणाला, 'हे जामदग्न्या, हा माझा बाण व्यर्थ जाणार नाहीं. आपण ब्राह्मण आहां म्हणून आपल्यास मारतां येत नाहीं. परंतु आपलें सामर्थ्य व आपण मिळविलेले उत्तम लोक याचा मी नाश करतों.' तेव्हा परशुराम म्हणाला, 'गुरूच्या आज्ञेप्रमाणें मी महेन्द्र पर्वतावर निघून जातों. तेव्हा तू आतां बाण सोड.' रामानें त्याप्रमाणें केल्यावर परशुराम महेन्द्र पर्वतावर निघून गेला.

# ३–विस्तृत टीपा

१ शोधार्थ—**अन्वेष्टुम्, अन्वेषणाय** । ठराव—**समयः** । मार्गे परतणें—**नि+वृत् (१ आ. प.)** । कोठेंहि दिसेना—**अदृश्यः अभवत्** । सचोटी—**ऋजुता, सत्यता** । वाटसरु—**पान्थः, पथिकः, अध्वगः** । थकले होते—**श्रान्ताः अभवन्** ।

२ तुरुंग—**कारागृहम्** । कैदी—**बन्दिन् (पुं.)** । पुढच्या क्षणीं—**क्षणान्तरे** । घडणें—**आ+पत् (१ प. प.)** । द्रोह करणें—**द्रुह् (४ प. प.)** । दवा खाणें—**घातम् आसेव् (१ आ. प)** ।

३ ताबा ठेवणें—**नि+यम् (१ प. प. नियच्छति)** । हाव धरणें—**लुभ् (४ प. प.)** ।

४ सुबत्ता—**सुभिक्षम्** । आपण तयार असलें पाहिजे—**अस्माभिः सज्जैः भवितव्यम्** । बदलणें—**चल् (१ प. प.)** ।

५ गप्प—**स्तब्ध (वि.)** । धनी—**स्वामिन् (पुं.)** ।

६ ध्यान करणें—**ध्यै (१ प. प.), चिन्त् (१०,उ. प.)** । थांबणें—**वि+रम् (१ प. प.)** । पाणी घालणें—**जलं वि+तॄ (१ प. प.), सिच् (६ उ. प. सिञ्चति-ते)** । झोपी गेली—**सुप्ताः, अस्वपन्, निद्रिताः** ।

७ क्षणभंगुर—**क्षणिक, चञ्चल, नश्वर (वि.)** । उतरणें—**अव+तॄ (१ प. प.)** । दिवा निरुपयोगी असतो—**दीपेन न किमपि प्रयोजनम्** । तोडला—**छिन्न, लून (क. भू. धा. वि.)** । सैरावैरा—**इतस्ततः** । पळूं लागले—**प्राद्रवन्, पलायन्त** ।

८ रस्त्याजवळ—**उपमार्गम्, उपरथ्यम्** (अव्ययीभाव स)

९ किती ज्यास्त—**किमुत, किंपुनः** । एकसारखें—**अचिरतम्** (अव्यय) ।

१० फिरावयास जाणें—**व्यायामार्थं चर् (१ प. प.)** । दीनवाणा—**दीन, आर्त (वि.)** । निघाले होते—**उद्भूत (क. भू. धा. वि.)** । नजर फेरणें

 

—**दृष्टिं क्षिप्** (६ उ. प.)। बुडत असलेली स्त्री—(**जले**) **निमज्जन्ती स्त्री**। नावाप्रमाणें—**यथाभिधानम्**। पोहणें—**प्लु** (१ आ. प), **तॄ** (१ प. प.)। कपडे काढणें—**वासांसि दूरीकृ**। मी फार आभारी आहें—**भृशम् अनुगृहीता अस्मि**। घसरणें—**स्खल्** (१ प प)।

११ त्याल् क्रूरतेनें वागवी—**तस्मिन् क्रूरतया व्यवाहरत्**। रिकामी गुहा—**रिक्ता-अध्यासा गुहा**। काटा—**कण्टकः**। झडप घालणें—**अभि+द्रु-धाव्** (१ प प)। पिंजरा—**पञ्जरः**। ओळखणें—**अभि+ज्ञा** (९ उ. प.)।

१२ पाच वर्षांचा—**पञ्चवर्षदेशीयः** (वि)। दूर करून—**दूरीकृत्य**। पश्चात्ताप झाला—**अनुशयान्वितः अभवत्, अनुतप्तः जातः**।

१३ नाग—**गजः**। तिचा विवाह लावला—**तेन तां पर्यणाययत्**। चाल करून जाणें—**अभि+द्रु**। बेढब स्वरूपाची—**विरूपाकृतिः**। त्रास देणें—**पीड्** (१० उ. प)।

१४ सोबती—**वयस्यः**। ध्यान करण्याचा खेळ खेळणें—**समाधिक्रीडया क्रीड्** (१ प. प)। थोड्याच वेळात—**अचिरात् एव, अल्पेन एव कालेन**। मिटणें—**नि+मील्** (१ प. प.)। कोंडणें—**नि+रुध्** (७ उ प)। फणा काढून उभा असलेला—**उद्धूतफणः** (सर्प)। भजणें—**धृष्** (५ प. प.)।

१५ जन्म देणें—**प्र+सू** (२ आ प), **जन्** (प्र.)। काय होईल तें होवो—**यद्भावि तद् भवतु**। गिळणें—**ग्रस्** (१ प प)। नजर करणें—**उपायनम् इव अर्पय**। स्वाधीन करणें—**हस्ते नि+क्षिप्** (६ उ. प.), **हस्ते समर्पय**। द्वंद्वयुद्धाला बोलाविलें—**द्वन्द्वाय आह्वयत**।

१६ डोह—**जलाशयः, ह्रदः**। महाविषारी—**तीव्रविषः** (सर्प)। विरस होणें—**खिन्नतां गम्, निरुत्साहतां गम्** (१ प. प)। बुडी मारणें—**आत्मानं क्षिप्** (६ उ. प)। खळबळ—**क्षोभः, विलोडनम्**। वेढणें—**परि+वृ** (५ उ प), **परि+रुध्** (७ उ प)। फुगविणें—**आ+ध्मा** (१ प प), **आ+प्यै** (१ आ. प. प्रयोजक—आप्याययति)।

मरणोन्मुख—आसन्नमृत्युः (वि.), मुमूर्षुः (वि.)। जीवदान देणें—सजीवं मुच् (६ उ. प)।

१७ दुष्काळ—दुर्भिक्षम्। खालावणें—अव+सद् (१ प. प.)। प्राणिमात्र—सर्वे प्राणिनः। संधि—समयः। गमावणें—हा (३ प. प.)। अपेक्षा न करिता—अनपेक्ष्य, निष्कामतया।

१८ परिमार्जन करणें—प्र+मृज् (२ प. प.), क्षल् (१० उ. प)। रिकामा खजिना—रिक्तः कोषः। खणणें—खन् (१ प. प.)। गरोदर—आपन्नसत्त्वा, गर्भिणी। उपजतच—जन्मतः एव। आनंद पोटात मावेनासा झाला—महर्षः आत्मनि न प्राभवत्। तयारी करणें—सम्भारान् कृ (८ उ. प)-चि (५ उ. प.)। जोरानें—सोत्साहम्।

१९ ओळखणें—अभि+ज्ञा (९ उ. प.)। हेर—चारः। पत्ता लागणें—निवासस्थलं ज्ञा (९ उ. प.)। वेळ बरी आहे—युक्तोऽयं समयः, अनुकूलोऽयं कालः। स्वारी करणें—अभि+गम् (१ प. प.)। टाळणें—परि+हृ (१ प. प.)। पुढें होणें—पुरतः भू, सज्जः भू (१ प. प.)।

२० सासू—श्वश्रूः (स्त्री.)। हाकविणें—निः+सृ (प्र.)। गोरगरीब—दीन, अनाथ, दरिद्र (वि)। वेढून टाकणें—वि+तु (१ प. प.)। भिकारीण—भिक्षुकी, दरिद्रा, अकिंचना। भजन—ईशस्तुतिः। भजन करूं लागणें—भक्तिम् आ+रभ् (१ आ. प.)। ईश्वरनामस्मरण करीत हिंडली—ईशनामस्मरणं कुर्वती अभ्रमत्। पालटणें—परि+वृत् (आ. प. प्र.)।
आणवणें—आ+नी (१ प. प. प्र.)। काळी पडणें—श्यामत्वं गम् (१ प. प.)। पश्चात्ताप होणें—अनुशयान्वितः भू (१ प. प.)।

२१ राज्य करणें—शास् (२ प. प.), ईश् (२ आ. प.)। किल्ला—दुर्गम्। फोडणें—भिद् (७ प. प.)। वाजविणें—ध्मा (१ प. प.)। जागा होणें—प्र+बुध् (४ आ प)। पाठवणें—प्र+इष् (४ प. प. प्र.), प्र+हि (५ प. प.)। रावलेला—प्रक्षुब्ध (वि.)।

२२ तिनें यौवनावस्थेंत प्रवेश केला—**सा यौवनावस्थाम् अस्पृशत्।** देणें—**प्र+दा** (३ उ प)। पळविणें—**अप+हृ** (१ प प.)।

२३ वळवावणें—**वलात् ग्रह्** (९ उ प)। वेढा देणें—**परि+वृ** (५ उ प.), **परि+रुध्** (७ उ प)। फरशी—**शिला**। निजविणें—**स्वप्** (२ प प प्रयोजक)। उतरणें—**प्र+विश्** (६ प प)। सुसर—**नक्र.**, **मकर.**। ओढणें—**आ+कृष्** (१ प प)।

२४ शिकार—**मृगया**। बाण मारण्याच्या बेतात होता—**शरं प्रक्षेप्तुम् उद्यत.-शरं प्रक्षेप्तुमना. आसीत्।** विनति करणें—**प्र+अर्थ्** (१० आ प)। निरपराधी—**निरागस्**, **निरपराध** (वि)। मारणें—**प्र+हृ** (१ प प)। पीडित—**आर्त** (वि)।

२५ मोडणें—**भञ्ज्** (७ प प)। आटपून—**समाप्य**। अडविणें—**प्रति+बध्** (७ उ प)। धनुष्याला बाण जोडणें—**धनुषि बाण सन्धा** (३ उ प)। अभय देणें—**रक्ष्** (१ प प) **त्रै** (१ आ प)। ऐकणें—**अनु+मन्** (४आ प.)। व्यर्थ जाणें—**निष्फलतां गम्** (१प प)।

---

# परिशिष्ट

## (वाक्यांतील शब्द जोडण्यास उपयुक्त सन्धिनियम)

### स्वरसन्धि

१ अ-आ, इ-ई, उ-ऊ, ऋ-ॠ हे सजातीय स्वर एकमेकांपुढें आले असतां त्या दोहोंबद्दल दीर्घ स्वर येतो.

दूत: वेगेन आगमनं करोति—वेगेनागमनं ...... अ+आ–आ
पृथ्वीं रक्षति ईश्वर —रक्षतीश्वर: ............... इ+ ई – ई
अश्रु उद्भवति नेत्रे—अश्रूद्भवति ............... उ+उ–ऊ
पितृ+ऋणम्—पितॄणम् ...................... ऋ+ऋ–ॠ

२ अन्त्य अ किंवा आ यापुढे इ-ई, उ-ऊ, ऋ-ॠ व ऌ हे स्वर आले असतां दोहोंबद्दल अनुक्रमें गुणरूपी फरक होतो, म्हणजे ए, ओ, अर् व अल् असे अनुक्रमें फरक होतात.

नयनेन ईक्षते—नयनेनेक्षते .. ... .. अ+ई–ए
हस्तेन उद्धरति—हस्तेनोद्धरति . ... अ+उ–ओ
सेवया ऋण—सेवयर्णं-* सेवय ऋण ... अ+ऋ–अर् किंवा* अ ऋ.

* ऱ्हस्व ऋ च्या पूर्वी ए, ऐ ओ व औ याशिवाय कोणताहि स्वर आल्यास 'ऋ'चा मागील स्वराशी नियम दोन प्रमाणें सन्धि करावा किंवा सन्धि न करता मागील स्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्व करावा.

३ शब्दाच्या अन्त्य अ-आ पुढे ए-ऐ व ओ-औ हे स्वर आले तर दोहोंबद्दल अनुक्रमें ऐ व औ असा फरक होतो.

इन्द्रस्य ऐरावत —इन्द्रस्यैरावत: ....... अ+ ऐ – ऐ
सुखेन औषध—सुखेनौषध ......... अ+औ–औ

४ इ-ई, उ-ऊ, ऋ-ॠ व ऌ यापुढे विजातीय स्वर आल्यास त्याचा अनुक्रमें य्, व्, र् व ल् होतो व त्यात पुढील स्वर मिळून पूर्णाक्षर होतें.

गच्छति एक —गच्छत्येक: ......... इ+ए–ये

वस्तु एतद्—वस्त्वेतद् ......... उ+ए–वे
रक्षितृ एतद्—रक्षित्रेतद् ......... ऋ+ए–रे

५ कोणत्याहि शब्दाच्या द्विवचनी रूपाच्या शेवटी 'ई, ऊ व ए' हे स्वर आल्यास त्याचा पुढें येणाऱ्या स्वराशीं सन्धि होत नाहीं. त्याचप्रमाणें 'अमी' या 'अदस्' सर्वनामाच्या रूपापुढें स्वर आल्यास सन्धि होत नाहीं. पुष्पे ईक्षते । गुरू आगच्छत । वधी इच्छतः । अमी ईशा ।

६ शब्दाच्या द्विवचनी रूपाशिवाय इतर रूपाच्या शेवटील 'ए' या स्वरापुढें 'अ' हा स्वर आल्यास, 'अ'चा लोप होतो व त्याचे जागीं ऽ असें चिन्ह (अवग्रह) लिहितात व त्याचा उच्चार करीत नाहींत.
वने अस्ति—वनेऽस्ति ।

७ शब्दाच्या द्विवचनान्त रूपाशिवाय इतर रूपाशेवटी 'ए' हा स्वर आल्यास व पुढें 'अ' शिवाय इतर स्वर आल्यास 'ए'चा 'अय्' असा फरक होतो; आणि त्यातील 'य्' पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर होतें किंवा 'य्'चा लोप होतो व त्यामुळें एकमेकापुढें येणाऱ्या दोन स्वरांचा सन्धि होत नाहीं.
वने ऋषिः—वनयृषि किंवा वन ऋषि । अय्+ऋ–अयृ–अ ऋ

८ शब्दाच्या शेवटी 'ओ' हा स्वर असून त्याचे पुढें 'अ' हा स्वर आला तर 'अ'चा लोप होतो व त्याच्या जागीं ऽ असें चिन्ह (अवग्रह) करतात व त्याचा उच्चार करीत नाहीत.
प्रभो अत्र–*प्रभो अत्र—प्रभोऽत्र ।

९ शब्दाच्या शेवटी 'ओ' हा स्वर असून त्याचे पुढें 'अ' शिवाय स्वर आला तर 'ओ'चा 'अव्' होतो आणि 'व्' पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर होतें किंवा 'व्'चा लोप होतो.
प्रभो इह–*प्रभो इह—प्रभविह–प्रभ इह ।

* संबोधनाच्या रूपाच्या अन्त्य स्वराचा पुढील स्वराशीं विकल्पानें सन्धि करावा

१० शब्दाच्या शेवटी 'ऐ व औ' हे स्वर असून त्यांचेपुढें जर कोणताहि स्वर आला तर त्यांचा अनुक्रमें 'आय् व आव्' असा बदल होतो व

'य् आणि व्' ही पुढील स्वरात मिळून त्याचें पूर्णाक्षर होतें किंवा त्याचा लोप होतो.

मोदामहे आनन्देन—मोदामहायानन्देन–मोदामहा आनन्देन ।

ग्लौ इति—ग्लाविति–ग्ला इति ।

## व्यंजनसन्धि

११ अन्त्य 'म्' पुढें स्वर आल्यास दोहोंचें मिळून पूर्णाक्षर होतें.

रामम् अपश्यत् — राममपश्यत् ।

१२ अन्त्य 'म्' पुढें कोणतेंहि वर्गव्यंजन आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो किंवा 'म्' बद्दल पुढील व्यंजनाच्या वर्गाचें अनुनासिक येतें.

पुष्पम् पश्यति—पुष्पं पश्यति–पुष्पम्पश्यति ।

यत्नम् करोति—यत्नं करोति–यत्नङ्करोति ।

१३ अन्त्य 'म्' पुढें श्, ष्, स्, र व ह् हे वर्ण आले तर त्याचा अनुस्वार होतो व य्, व्, ल् ही व्यंजन आली तर त्याचा अनुस्वार होतो किंवा अनुनासिक्युक्त य्, व्, ल् होतो.

मित्रम् शंसति—मित्रं शंसति ।

मित्रम् लोचनाभ्याम्—मित्रं लोचनाभ्याम्–मित्रँल्लोचनाभ्याम् ।

टीपः—वाक्याच्या शेवटी येणाऱ्या 'म्' चा अनुस्वार करू नये, 'म्' च लिहावा.

१४ अन्त्य 'न्' पुढें स्वर आल्यास व पूर्वी दीर्घ स्वर असल्यास दोहोंचें पूर्णाक्षर होतें व पूर्वी ऱ्हस्व स्वर असल्यास 'न्' चे द्वित्व होतें.

वृक्षान् उदकेन—वृक्षानुदकेन परंतु

एतस्मिन् उद्याने—एतस्मिन्नुद्याने ।

१५ अन्त्य 'न्' पुढें च्, छ्, ट्, ठ्, त् व थ् ही व्यंजनें आली तर 'न्' चा अनुस्वार व विसर्ग होतो व विसर्गाचा 'च्, छ्' पूर्वी श् होतो, 'ट्, ठ्,' पूर्वी ष् होतो व 'त्, थ्' पूर्वी स् होतो.

ग्रामान् चलति—ग्रामांः चलति–ग्रामांश्चलति ।

१६ अन्त्य 'न्' पुढें ल् आल्यास 'न्' चा 'अनुनासिकयुक्त ल्' होतो.

अवदन् लोकाः—अवदँल्लोका ।

१७ अन्त्य 'न्' पुढें ज्, झ् व श् हे तालव्य वर्ण आले तर 'न्' चा 'ञ्' होतो.
देशान् जयति—देशाञ्जयति ।

१८ शब्दाच्या शेवटीं अनुनासिकावाचून इतर वर्गव्यंजन असून त्याचे पुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आलें तर अन्त्य व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन येतें.
वनात् आगच्छति—वनादागच्छति । नगरात् बहिः—नगराद्बहिः ।

१९ शब्दाच्या शेवटीं अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजन असून त्याचे पुढें अनुनासिकानें आरंभ झालेला शब्द आला तर अन्त्य व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन किंवा अनुनासिक येतें. मात्र तो पुढील अनुनासिक-युक्त शब्द प्रत्यय असल्यास अनुनासिकच होतें.
अपश्यत् मण्डलं—अपश्यद्मण्डलं किंवा अपश्यन्मण्डलम् । परंतु मृद्+मयः (घट)—मृन्मयः (घटः)

२० 'त-वर्गाचीं व्यंजनें आणि स्' याचा आणि 'च-वर्गाचीं व्यंजनें आणि श्' याचा संधि होताना त् बद्दल च्, द् बद्दल ज्, ध् बद्दल झ्, न् बद्दल ञ् आणि स् बद्दल श् असे फरक होतात.
प्रासादात् जनं—प्रासादाद् जनं-प्रासादाज्जनम् ।
अस्मिन् शात्रौ—अस्मिञ्शात्रौ ।

२१ 'श्' नें आरंभ होणाऱ्या शब्दापूर्वी कोणत्याहि वर्गाचें अनुनासिकाशिवाय इतर व्यंजन आल्यास आणि 'श्' पुढें स्वर, अन्तःस्थ वर्ण, अनुनासिक किंवा ह् असल्यास 'श' चा विकल्पानें 'छ्' होतो.
तस्मात् शौरिः—तस्माच्शौरिः किंवा तस्माच्छौरिः ।
गृहात् श्वः—गृहाच्श्वः किंवा गृहाच्छ्वः ।

२२ 'त-वर्गाचें व्यंजन आणि स्' यांचा 'ट-वर्गाचें व्यंजन आणि ष्' यांच्याशीं सन्धि होतांना त् चा ट्, द् चा ड्, ध् चा ढ्, न् चा ण् व स् चा ष् असा फरक होतो.
वृक्षात् डयन्ते—वृक्षाद् डयन्ते-वृक्षाड्डयन्ते ।

२३ 'त्' पुढें 'ल्' नें आरंभ झालेला शब्द आल्यास 'त्' चा 'ल्' होतो.
अपश्यत् लोचनाभ्याम्—अपश्यल्लोचनाभ्याम् ।

२४ कोणत्याहि वर्गाच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें कठोर व्यंजन आल्यास, मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें पहिलें व्यंजन येतें.
विपद् पीडयति—विपत्पीडयति ।

२५ 'ह्' नें आरंभ होणाऱ्या शब्दापूर्वी अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजन आल्यास 'ह्' बद्दल विकल्पानें मागील व्यंजनाच्या वर्गाचें चौथें अक्षर येतें
धनिकाद् हरति—धनिकाद् हरति किंवा धनिकाद्धरति ।

२६ 'छ्' च्या पाठीमागें ह्रस्व स्वर, 'मा' हें निषेधार्थी अव्यय आणि 'आ' हा उपसर्ग आल्यास, 'छ्' ला 'च्' हें व्यंजन जोडतात, आणि 'छ्' च्या पूर्वी इतर दीर्घ स्वर असल्यास 'च्' विकल्पानें जोडतात.
वृक्ष+छाया—वृक्षच्छाया । मा+छेदय—माच्छेदय । आ+छादयति—आच्छादयति । परंतु लक्ष्मी+छाया—लक्ष्मीछाया किंवा लक्ष्मीच्छाया ।

## विसर्गसन्धि

२७ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें क्, ख्, प् व फ् हीं कठोर व्यंजनें आलीं तर विसर्गाचा बदल होत नाहीं
वृक्षः फलति । रामः पश्यति । शनैः खनति ।

२८ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें च्-छ्, ट्-ठ् व त्-थ् हीं कठोर व्यंजनें आलीं तर विसर्गाचा अनुक्रमें श्, ष् व स् होतो.
पान्थः चलति—पान्थश्चलति । नाविकाः तरन्ति—नाविकास्तरन्ति ।

२९ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें श्, ष् व स् हीं कठोर व्यंजनें आलीं तर विसर्गाचा बदल होत नाहीं अथवा अनुक्रमें श्, ष् व स् होतो.
रामः शंसति—रामः शंसति किंवा रामश्शंसति ।

३० विसर्गापूर्वी 'अ' असून पुढें 'अ किंवा मृदु व्यंजन' आलें तर विसर्गाचा 'उ' होतो व तो मागील 'अ' मध्यें मिळून त्याचा 'ओ' होतो, व पुढील 'अ' चा नियम ८ प्रमाणें अवग्रह होतो.
रामः अस्ति—राम उ+अस्ति—रामोऽस्ति ।
रामः गच्छति—राम उ+गच्छति—रामो गच्छति ।

३१ विसर्गापूर्वी 'अ' असून पुढे 'अ' शिवाय स्वर आला तर विसर्गाचा लोप होतो.
रामः इच्छति—राम इच्छति ।

३२ 'स व एष' यांच्या विसर्गापुढे 'अ' शिवाय अन्य वर्ण आल्यास विसर्गाचा लोप होतो. 'अ' आल्यास नि. ३० प्रमाणें सन्धि होतो.
सः-एषः अस्ति—सोऽस्ति-एषोऽस्ति । परंतु
सः-एषः गच्छति-इच्छति—स-एष गच्छति-इच्छति ।

३३ विसर्गापूर्वी 'आ' असून पुढे कोणताहि स्वर अथवा मृदु व्यंजन आलें तर विसर्गाचा लोप होतो.
बालाः गच्छन्ति-इच्छन्ति—बाला गच्छन्ति-इच्छन्ति ।

३४ विसर्गापूर्वी 'अ-आ' शिवाय स्वर असून पुढें स्वर अथवा मृदु व्यंजन आलें तर विसर्गाचा 'र्' होतो.
पाणीः अस्मि—पाणीर् अस्मि-पाणीरस्मि ।
गुरुः गच्छति—गुरुर् गच्छति-गुरुर्गच्छति ।

३५ विसर्गाबद्दल आलेला 'र्' अथवा मूळचा 'र्' याच्यापुढें 'र्' नें आरंभ झालेला शब्द आला तर मागील 'र्' चा लोप होतो व पूर्वीचा स्वर ह्रस्व असल्यास दीर्घ होतो.
हरिः रक्षति—हरिर् रक्षति-हरी रक्षति । हरेः रथ -हरेर् रथ - हरे रथ ।
प्रातर् रमते—प्राता रमते । पुनर् रात्री—पुना रात्री ।

३६ 'भोस्' या अव्ययापुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आलें तर 'स्' बद्दल आलेल्या विसर्गाचा लोप होतो.
भोः इह—भो इह । भोः गच्छत—भो गच्छत ।

३७ अन्त्य 'स्' पुढें कोणतेंहि अक्षर येवो या न येवो तरी त्याचा विसर्ग होतो.
गच्छामस्—गच्छामः ।

३८ अन्त्य 'र्' पुढें कोणतेंहि कठोर व्यंजन आल्यास अथवा कोणताहि वर्ण न आल्यास 'र्' चा विसर्ग होतो.
प्रातर् काल —प्रातः काल । पुनर्—पुनः ।

---

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | २१ | ( मार्ग ) | ( मार्ग ) |
| ३५ | १६ | -वद्दे | ब्रूवद्दे |
| ४३ | ६ | ऐडद्वम् | ऐडद्वम् |
| ५२ | ८ | त-द | त-द् |
| ५३ | २७ | दुह | दुह् |
| ५४ | ५ | नरा | नरा |
| ६५ | १८ | ज्य | राज्य |
| ६८ | ५ | पृ | प |
| ७७, ९० | २५, १६ | प | ञ्हु |
| ७९ | २ | मृप | मृप् |
| ९३ | १८ | बहुमाही | बहुभीदि |
| ९८ | २२-२३ | तव नावित च | तव च जीवित |
| १०० | २० | ह्रु | ह्र् |
| १४८ | १६ | विम्ब | निम्ब |
| १५१ | १५ | प्रवासिनोयान्ति | प्रवासिनो यान्ति |
| १५२ | १ | शासामुविलम्ब | शास्यासु विलम्ब |
| १५३ | २२ | सन्ये | सैन्ये |
| १६५ | २३ | तता | ततो |
| १७८ | १३ | मारग | मारगा |